# नवभारत

वर्ष ७ वें ] डिसेंबर १९५३ [ अंक ३ रा



किंमत १ रुपया

अनुक्रमणिका











नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष सातवें | अंक तिसरा

# नवभारत

डिसेंबर १९५३

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर–आचार्य स. ज. भागवत–श्री. हरि कृष्ण मोहनी–प्रा. गोवर्धन पारीख

प्रा. वि. म. बेडेकर का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत मासिक', ९०६ शिवाजी-नगर, पुणें ४

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक, C/o प्राज्ञ प्रेस वाई ( जि. सातारा )

# 'नवभारत' मासिक, डिसेंबर १९५३

## — लेखक-परिचय —

[ खालीं दिलेल्या लेखकांशिवाय, या अंकांतील इतर लेखकांचा परिचय या वर्षी पूर्वी त्यांचे लेख आले त्या त्या वेळीं दिला आहे. — का. सं. ].

**म. म. प्रा. वा. वि. मिराशी ( नागपूर )**— प्रसिद्ध प्राच्यविद्यापंडित व पुराणेतिहाससंशोधक, 'कालिदास' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**श्री. वा. अ. खलप ( पुणें )**— पोर्तुगीज, कोंकणी व प्राचीन इतिहास यांचे व्यासंगी.

**श्री. म. शं जावडेकर एम्. ए. ( मुंबई )**— ' Economic Trends ' या नियतकालिकाचे सह-संपादक.

**श्री. भा. म. काळे एम्. ए. बी. टी. ( मुंबई )**— अर्थशास्त्राचे व्यासंगी. ' युद्धोत्तर आर्थिक घटना', ' हिंदचा कापडाचा धंदा ', ' अन्नधान्याचा प्रश्न ' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**प्रा. गो. म. कुळकर्णी ( विजापूर )**-- विजापूर येथील विजय कॉलेजमध्यें मराठीचे प्राध्यापक. ' स्वतंत्र भारताचे द्रष्टे न्या. मू. रानडे', ' रसग्रहण : कला व स्वरूप ' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**श्री. मा. प. मंगुडकर एम्. ए. ( पुणें )**— राज्यशास्त्राचे व्यासंगी. पुणें येथील नौ. वाडिया कॉलेज-मध्यें ट्यूटर.

**श्री. शान्ताराम रामचन्द्र बी. ए. ( कोल्हापूर )** -- ' नवधारा ' या काव्यसंग्रहाचे एक संपादक.

**तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी ( वाई )** -- ' धर्मकोशा'चे मुख्य संपादक. ' हिंदुधर्मसमीक्षा,' ' जडवाद ', ' वैदिक संस्कृतीचा विकास ' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**श्री. प्रद्युम्न टंकसाली ( मुधोळ )** -- येथील ' सरस्वतीमंदिर ' या राष्ट्रभाषाप्रचारसंस्थेचे चालक.

**श्री. म. मु. शारंगपाणि एम्. ए. ( रत्नागिरि )**— तत्त्वज्ञान व मानसशास्त्र यांचे व्यासंगी.

**श्री. राजा मंगळवेढेकर ( दौंड )** -- येथील ' मजदूरपंचायत ' मधील कार्यकर्ते.

**प्रा. पु. ना. वीरकर एम्. ए. बी. टी. टी. डी. ( लंडन ) ( पुणें )**— पुणें येथील न्यू इंग्लिश स्कूल ( टिळक रोड ) चे प्रमुख. पुणें - मुख्याध्यापकसंघाचे अध्यक्ष. ' किशोर-संगीत ', ' संस्कृत कविश्रेष्ठ ' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

* मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारें महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणें, हें या मासिकाचें ध्येय व उद्दिष्ट आहे.

* या मासिकांत येणाऱ्या लेखांत कोणत्याहि विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतु नाहीं.

* मासिकांत प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणांत सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

अनुक्रमणिका






प्रा. म. म. वा. वि. मिराशी

# ' मऱ्हाटी संस्कृति ' : कांहीं समस्या

श्री. शं. बा. जोशी यांच्या अलीकडे प्रसिद्ध झालेल्या **' मऱ्हाटी संस्कृति ' — कांहीं समस्या** या ग्रंथाचा सुंदर परिचय **श्री. दि. के. बेडेकर** यांनीं **'नवभारत'च्या जून १९५३ च्या अंकांत** करून दिला आहे. तेव्हां त्या ग्रंथाविषयीं परिचयात्मक लिखाणाची आवश्यकता नाहीं. श्री. बेडेकर यांनीं ग्रंथाचा परिचय करून देत असतांना त्यांतील कांहीं प्रश्नांविषयीं आपले विचार मांडले आहेतच. तरीहि ग्रंथकर्त्यानें या ग्रंथांत महाराष्ट्रीय इतिहास व संस्कृति यांविषयीं अनेक वर्षे विस्तृत वाचन व खोल मनन करून अनेक प्रश्नांविषयीं आपले सिद्धांत मांडले असल्यामुळें त्यांची आणखी चर्चा होणें जरूर आहे. म्हणून संपादकांच्या सूचनेवरून त्यांतील कांहीं प्रश्नांविषयीं मी आपले विचार व्यक्त करीत आहे. प्रथमच एक गोष्ट स्पष्ट केली पाहिजे. ती ही कीं पुढील विवेचन केवळ सत्यान्वेषणाच्या दृष्टीनें केलें आहे. ज्या आन्तरभारतीच्या विद्यमानें प्रस्तुत ग्रंथाचें प्रकाशन झालें आहे तिच्या उद्देशाविषयीं व कार्याविषयीं मला नितान्त आदर आहे. श्री. जोशी यांनींहि इतिहास, भाषा, देवदेवळें, धर्मपंथ इत्यादिकांच्या पुराव्यांचे धागेदोरे मोठ्या कौशल्यानें गुंफून आपले सिद्धांत मांडले आहेत. त्यांनीं परिश्रम अपार केले आहेत यांत संशय नाहीं. तथापि त्यांच्या संशोधनाला न जुळणारा असा कांहीं पुरावा असल्यास तोहि लक्षांत घेऊन त्याची सत्यासत्यता पडताळणें आवश्यक आहे. या दृष्टीनें खालील प्रयत्न केला आहे.

**समस्या : १ : मऱ्हाट व वऱ्हाड यांची व्युत्पत्तिः**

श्री. जोशी यांनीं आपल्या ग्रंथाला 'मऱ्हाटी संस्कृति' असें नांव मुद्दामच दिलें आहे. कारण त्यांच्या ग्रंथाचा विषय मुसलमानपूर्वकालीन महाराष्ट्रीय संस्कृति असा आहे. त्या काळीं मऱ्हाटी हें रूपच प्रचलित होतें, हें ज्ञानेश्वरीवरून स्पष्ट दिसतें. मऱ्हाट हा शब्द प्राकृत 'मरहट्ट' या शब्दापासून बनला आहे. प्राकृत व्याकरणकार ' मरहट्ट ' शब्दाची व्युत्पत्ति महाराष्ट्र शब्दापासून लावतात. हेमचन्द्राची ' महाराष्ट्रे ', आणि ' महाराष्ट्रे हरोः' (८, १, ६९; २, ११९) अशीं याविषयीं दोन सूत्रें आहेत. 'महाराष्ट्र' शब्दांतील 'आ' बद्दल 'अ' येऊन व वर्णव्यत्यास होऊन ' मरहट्ट ' शब्द बनला असें त्याचें मत आहे. 'अलचपुर' पासून 'अचलपुर' व 'वाराणसी' पासून ' वाणारसी ' अशीं वर्णव्यत्यासाचीं इतरहि दोन उदाहरणें त्यानें दिलीं आहेत. ' मरहट्ट ' हा शब्द ' महाराष्ट्र ' पासून बनला अशी संस्कृत व प्राकृत ग्रंथकारांची समजूत होती यांत संशय नाहीं. पाली महावंसो ग्रंथांतहि ( १२, ५ व ३७ ) महारट्ठ असें रूप आढळतें तें महाराष्ट्र शब्दापासूनच निघालें आहे.

पण श्री. जोशी यांस ही व्युत्पत्ति मान्य नाहीं. त्यांच्या मतें मरहट्ट हा देशवाचक शब्द ' महाराष्ट्र ' पासून बनला असणें शक्य नाहीं, कारण—

(१) प्राचीन काळीं देशांना जीं नांवें मिळालीं तीं तेथील मूळ वसाहत करणाऱ्या जनांवरून. पण महाराष्ट्र हा शब्द जनवाचक नाहीं.

(२) ' महाराष्ट्र ' याचा अर्थ 'मोठें राष्ट्र'. हें नांव देशाची पाहणी होऊन मोजमाप केल्यावरच येऊं शकेल. तें मूळ नांव असणें शक्य नाहीं.

(३) महाराष्ट्र शब्द खिस्ती शकाच्या आरंभीं होऊन गेलेल्या वररुचीच्या व्याकरणांत प्रथम आढळतो. त्याकाळीं महाराष्ट्री भाषा म्हणून प्रसिद्ध होती पण राष्ट्र या नात्यानें महाराष्ट्राचें अस्तित्व मान्य नव्हतें. तेव्हां ' महाराष्ट्र ' हें देशनाम प्राचीन नाहीं. हें नाम रूढ होण्यापूर्वी देशाला कांहींतरी नांव असलेंच पाहिजे. तें नांव ' मरहट्ट ' असें होतें. हें नांव कानडी आहे. कानडींत ' मर ' याचा अर्थ झाड असा होतो. वऱ्हाड हा मूळचा महाराष्ट्र. यांत सध्यांहि हटगार नांवाचे धनगर लोक बऱ्याच महत्त्वाचे आहेत. या हटगारांची प्रमुख वस्ती ज्या प्रदेशांत आहे त्याला हट्ट








देश असें नांव मिळाल्यास आश्चर्य नाहीं. तेव्हां ' मरहट्ट ' म्हणजे हाट लोकांचा झाडीयुक्त देश. या अर्थाचा ' झाडिमंडळ ' असा शब्द यादवकालीन शिलालेखांत आढळतो. हेमाद्रीनें झाडिमंडळ जिंकून घेतल्याचें वर्णन आहे. महानुभावांच्या ' लीलाचरित्र ' व 'रुक्मिणीस्वयंवर' ह्या प्राचीन ग्रंथांत 'झाडिमंडळ' हा शब्द आला आहे. त्याचा अर्थ ' गोंडवन ' किंवा ' आजचा मध्यप्रांत '. तेव्हां मरहट्ट म्हणजे वऱ्हाड. ' वऱ्हाड ' हा शब्दहि ' मऱ्हाट ' शब्दापासून बनला आहे. कानडीमध्यें ' म' चा ' व ' होतो तेव्हां मऱ्हाटचें वऱ्हाट–वऱ्हाड होणें अशक्य नाहीं. मरहट्ट याचें मरहाट–मऱ्हाट असें रूप होऊन त्याच्याशीं उच्चारांत साम्य असलेलें महाराष्ट्र असें संस्कृत रूपान्तर घुणाक्षरन्यायानें झालें असणें शक्य आहे ( पृ. ९५ ).

श्री. जोशी यांची मऱ्हाट व वऱ्हाड या देशनामांची व्युत्पत्ति शक्य तों त्यांच्या शब्दांत दिली आहे. आतां उपलब्ध साधनांवरून तिचें परीक्षण करूं.

' महाराष्ट्र ' शब्दाची व्युत्पत्ति लावण्याचे अनेक प्रयत्न आतांपर्यंत करण्यांत आले. महारांचें राष्ट्र तें महाराष्ट्र, महान् राष्ट्र किंवा महारठींचा देश म्हणून महाराष्ट्र अशा व्युत्पत्त्या देण्यांत आल्या. पण त्या सर्वसंमत नसल्यानें समंजस नाहींत असें श्री. जोशी म्हणतात. आमच्या मतें ' समंजसपणा 'ची ही कसोटी भ्रामक आहे. कोणतेंहि संशोधन सर्वसंमत होईलच असा नेम नाहीं. श्री. जोशी यांची व्युत्पत्तीहि सर्वसंमत होईल असें कोणी सांगावें ? तेव्हां कोणत्याहि प्रमेयाची सत्यासत्यता उपलब्ध प्रमाणांवरूनच ठरविली पाहिजे.

महाराष्ट्र हें देशनाम फार प्राचीन ग्रंथांत येत नाहीं हें खरें. त्याचा पहिला उल्लेख इ. स. च्या चौथ्या शतकांतील एरण येथील स्तंभलेखांत आढळतो. त्यापूर्वी झालेल्या वररुचीनें ' महाराष्ट्री ' हें त्या प्रदेशांतील प्राकृत भाषेचें नांव दिलें आहे. देशावरून भाषेला नांव पडतें हें लक्षांत घेतां वररुचीच्या काळीं महाराष्ट्र हें देशनाम प्रचलित होतें यांत संशय नाहीं. ' महाराष्ट्री ' भाषा त्या काळीं प्रसिद्ध होती पण महाराष्ट्र हें देशनाम मात्र मान्यता पावलें नव्हतें या विधानाचा अर्थ आम्हांस समजत नाहीं. 'महाराष्ट्र' हें नाम आरंभींच्या लेखांत येत नाहीं हें प्रमाण अभावात्मक (argumentum ex silentio ) आहे. तें निर्णायक मानतां येत नाहीं. उल्लेखाभावाचीं कारणें अनेक असूं शकतील. उदाहरणार्थ, वाकाटकांचें राज्य विदर्भदेशावर जवळ जवळ तीन शतकें होतें. पण त्यांच्या एकाहि कोरीव लेखांत विदर्भाचा निर्देश नाहीं. याचें कारण तसा निर्देश करण्याचा प्रसंग आला नाहीं हें होय. गौतमी बालश्रीच्या नाशिक येथील लेण्यांत तिचा मुलगा गौतमीपुत्र सातकर्णि ज्या प्रदेशांवर राज्य करीत होता त्यांचा निर्देश आहे. त्याचें राज्य महाराष्ट्रावर होतें. तथापि त्या लेखांत त्याचा उल्लेख नाहीं. याचें कारण त्यांत विदर्भ, अश्मक, ऋषिक इत्यादि महाराष्ट्रांत अन्तर्भूत होणाऱ्या अनेक देशांचा नामनिर्देश आहे.[१] तेव्हां 'महाराष्ट्र' हें देशनाम निदान खिस्तीशकाच्या आरंभाइतकें तरी प्राचीन आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

महाराष्ट्र हें नांव फार प्राचीन नाहीं असें मान्य केलें तरी श्री. जोशी यांना संमत असें मरहट्ट हें नांव तरी त्याच्यापेक्षां प्राचीन आहे काय ? तें तर कुवलयमाला ( इ. स. चें ८ वें शतक ), राजशेखर ( इ. स. चें १० वें शतक ) इत्यादिकांच्या ग्रंथांत इ. स. ७५० नंतर प्रथम आढळतें. त्यापूर्वींच्या ' महावंसो ' ( इ. स. चें पांचवें शतक ) ग्रंथांत ' महारट्ठ ' शब्द आला आहे. पण तो संस्कृत ' महाराष्ट्र'पासून बनला आहे असें श्री. जोशी कबूल करतात. तेव्हां ' मरहट्ठ ' शब्द ' महाराष्ट्र'पेक्षां प्राचीन नाहीं. संस्कृत व प्राकृत ग्रंथकारांच्या मतें तर तो ' महाराष्ट्र'चें प्राकृत रूप आहे. अर्थात् तो त्यानंतरचा आहे. महाराष्ट्रींतील पहिलें काव्य ' सत्तसई ' यामध्येंहि त्यांतील भाषेला ' मरहट्टी ' असें म्हटलें नसून 'पाउअ' ( प्राकृत ) असेंच म्हटलें आहे.

हीच गोष्ट ' वऱ्हाड ' या देशनामाची. हा शब्दहि प्राचीन वाङ्मयांत येत नाहीं. महानुभावी वाङ्मयांत तो प्रथम आढळतो. प्राचीन संस्कृत वाङ्मयांत याचें नांव ' विदर्भ ' व प्राकृत कोरीव लेखांत ' विदभ ' असेंच येतें. वऱ्हाड हें नांव तेराव्या शतकांत रूढ झालें आहे. मग त्याची व्युत्पत्ति कांहींहि असो. – " मरहट्ट ह्या

१. एपिग्राफिया इंडिका, पु. ८, पृ. ६० इ.








शब्दाचा प्रयोग फार प्राचीन नसला तरी त्याच्या अर्थाकडे लक्ष देतां तो फार प्राचीन काळापासून वऱ्हाडला लावला जात असावा. यादवकाळीं वऱ्हाडला ' झाडिमंडळ ' म्हणत असत. ' मरहट्ट ' याचा अर्थहि झाडी असलेला हट्ट लोकांचा देश असाच होतो " असें श्री. जोशी यांचें म्हणणें आहे त्याचा आतां विचार करूं :

कोणत्याहि प्राचीन ग्रंथांत किंवा कोरीव लेखांत वऱ्हाडचें 'दाट झाडी असलेला देश' अशा अर्थाचें नांव आढळत नाहीं. यादवांच्या ठाण्यास सांपडलेल्या ताम्रपटांत हेमाद्रीनें झाडिमंडळ जिंकलें असा निर्देश आहे खरा, पण त्याचा अर्थ त्यानें वऱ्हाड जिंकला होता असा होत नाहीं. हेमाद्रि हा यादवनृपति महादेव व रामचंद्र यांच्या काळीं करणाधिप व मुख्य मंत्री होता. तो उदयास येण्यापूर्वीच वऱ्हाडचा बराचसा भाग यादवांच्या अंमलाखालीं आला होता. वऱ्हाडच्या बुलढाणा जिल्ह्यांतील अमडापूर गांवीं यादवनृपति सिंघण याचा शके ११३३ (सन १२११–१२ )चा शिलालेख[२] सांपडला आहे. सिंघणाचा सेनापति खोलेश्वर यानें अमरावती जिल्ह्यांतील अचलपुर, खोलापूर वगैरे ठिकाणीं मंदिरें बांधली व अग्रहार दिले असा त्याच्या आंबे येथील लेखांत[३] उल्लेख आहे. सिंघणाचा नातू कृष्ण याचाहि शके ११७७चा लेख अमरावतीहून वीस मैलांवर नांदगांव येथील खंडेश्वराच्या देवळांत आहे.[४] त्याच राजाचा दुसरा लेख चांदा जिल्ह्यांत मार्कंडी येथील पुरातन देवालयाजवळ सांपडला आहे.[५] तेव्हां हेमाद्रीपूर्वीच हल्लींचा वऱ्हाड यादवांच्या अमलाखालीं आला होता यांत संशय नाहीं. कृष्णाचा मुलगा रामचंद्र किंवा रामदेवराव याच्या काळीं नागपूर, भंडारा व चांदा जिल्ह्याचा कांहीं भाग जिंकून यादवांच्या राज्याला जोडला गेला असें पुरुषोत्तमपुरी ताम्रपटावरून[६] दिसतें. रामदेवरावाचा एक लेख नागपूरजवळ रामटेक येथें सांपडला आहे.[७] नागपूर, भंडारा, चांदा या भागालाच सध्यां झाडी म्हणतात. हा भाग जिंकण्यांत हेमाद्रीनें प्रमुख भाग घेतला असावा म्हणून त्यानें झाडीमंडळ जिंकलें होतें असें ठाणे ताम्रपटांत म्हटलें आहे.

वरील विवेचनावरून वर्धा नदीच्या पूर्वेस असलेल्या मध्यप्रदेशाच्या भागासच ' झाडीमंडळ ' अशी संज्ञा होती असें दिसून येईल. ' रुक्मिणीस्वयंवरां'त ( ओ. २४५ ) झाडमंडळाचा उल्लेख आहे पण त्यानें कोणता देश विवक्षित आहे हें निश्चितपणें सांगतां येत नाहीं. 'लीळाचरित्रां'तील झाडीच्या उल्लेखावरून तें अचलपुरापासून फार दूर नसलेलें एक ठिकाण दिसतें. (ह. ना. नेने कृत 'लीळाचरित्र', एकांक, पृ. ३७ )

महाराष्ट्रांत प्राचीन काळीं हट्टि किंवा हाट लोकांची वस्ती होती असें एकाहि कोरीव लेखावरून दिसत नाहीं. नाशिक, कार्लें, कान्हेरी, भाजा, बेडसा, जुन्नर वगैरे ठिकाणच्या लेण्यांत समाजाच्या वरच्या तसेंच अगदीं खालच्या थरांतील लोकांचे – श्रेष्ठी, सोनार, सुतार, कारकून, व्यापारी इत्यादिकांचे लेख आहेत. पण त्यांत हट्टि किंवा हाट लोकांचा नामनिर्देश आढळत नाहीं. तेव्हां देशाला आपलें नांव देण्याइतक्या प्रामुख्यानें त्यांची महाराष्ट्रांत वस्ती होती असें दिसत नाहीं. त्या काळीं महाराष्ट्रांत प्रमुख वस्ती नागांची होती. महाराष्ट्रांतील कित्येक रठी व महारठी नागवंशाचे किंवा नागपूजक होते. गतवर्षी सांपडलेल्या एरणस्तम्भलेखांत आपला महाराष्ट्रीय म्हणून साभिमान उल्लेख करणारा शकांचा सेनापति सत्यनाग हा नागवंशी होता[८]. अजंठ्याचीं लेणीं कोरण्यांत नागांनीं पुढाकार घेतला होता म्हणून त्या ठिकाणीं नागराज्यांचीं अनेक शिल्पें व चित्रें आढळतात. हट्टि किंवा हटगार हे लोक त्या काळीं प्रमुख असते तर त्यांचाहि नामनिर्देश किंवा इतर खुणा महाराष्ट्रांत आढळल्या असत्या.

पट्टि किंवा हट्टि लोकांवरून महाराष्ट्रांतील पाडा, वाडा अन्तीं असलेलीं स्थलनामें बनलीं असें श्री. जोशी सांगतात. पण तीं नांवें महाराष्ट्रांत किंवा

२. एपिग्राफिया इंडिका, पु. २१, पृ. १२७.
३. दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाचीं साधनें, भाग १ पृ. ७३.
४. ए. इं, पु. २७, पृ. ९. ५. भा. इं. सं. मं. त्रै., पु. १९, पृ. ८५.
६. ए. इं., पु. २५, पृ. २११. ७. ए. इं., पु. २५, पृ. ७.
८. भा. इ. सं. मं., पु. ३३, पृ. ३२.

कर्णाटकांतच आढळत नसून उत्तरहिंदुस्थानांतहि आढळतात. तीं संस्कृत 'पाटक' शब्दावरून बनलीं आहेत. पाटक पाट्य्[९] धातूपासून बनला असून त्याचा अर्थ भूविभाग असा आहे. देशांतील जमिनीचे विभाग होऊन बनलेल्या खेड्यांच्या नामांच्या अन्तीं पाटक किंवा वाटक हा शब्द आढळतो. उदाहरणार्थ, उत्तर-प्रदेशाच्या गोरखपूर जिल्ह्यांतील कल्ह गांवीं सांपडले-ल्या ताम्रपटांतील असथीपाटक, थिउलपाटक, वणिआ-पाटक, दुआरिपाटक हीं ग्रामनामें घ्या. यासारखींच ग्रामनामें इतर प्रदेशांतहि आढळतात. पाटकपासून पुढें पाडा व वाटकपासून वाडा हे सध्यां ग्रामनामांच्या शेवटीं आढळणारे शब्द बनलेले दिसतात. त्यांचा 'पट्टि' 'हट्टि' शब्दांशीं संबंध जोडण्याची जरूरी नाहीं.

'मरहट्ट' याचा अर्थ दाट झाडी असलेला हट्ट लोकांचा देश मानल्यास त्याचें महाराष्ट्र असें संस्कृती-करण कसें झालें अशी अडचण उत्पन्न होते. मरहट्ट व महाराष्ट्र यामध्यें कांहीं उच्चारसाम्य आहे म्हणून घुणाक्षरन्यायानें महाराष्ट्र शब्द बनला हें स्पष्टीकरण मनाला पटत नाहीं. श्री जोशी यांनीं मोक्ष मूलर व इस्टुर फाकडा हीं उदाहरणें दिलीं आहेत. प्रो. मॅक्स मूलर संस्कृत विद्वान् असल्यानें तो मजेखातर आपली सही मोक्ष मूलर अशी कधीं कधीं करीत असे. इस्टुर फाकडा हें स्टुअर्ट नांव उच्चारण्यास कठीण म्हणून अज्ञ लोकांनीं केलेलें अपभ्रष्ट रूप. त्याचा दाखला येथें उप-योगी पडणार नाहीं. मरहट्ट हें मूळ रूप असून त्याचें नंतर संस्कृत रूपांतर केलें असल्यास संस्कृतज्ञांनीं तें मूलशब्दार्थाचें वाचकच बनविलें असतें, केवळ उच्चा-रणसाम्य साधण्याचा प्रयत्न केला नसता असें वाटतें.

मग मऱ्हाट व वऱ्हाड यांच्या खऱ्या व्युत्पत्त्या कोणत्या असा प्रश्न उपस्थित होतो. त्याचें उत्तर देण्याचा यथामति प्रयत्न करूं.

मऱ्हाट हा शब्द 'महाराष्ट्र'पासूनच बनला आहे. हेमचन्द्रानें सांगितल्याप्रमाणें महाराष्ट्र याचें 'मरहट्ट' असें रूप प्राकृतांत बनतें. त्यानंतर मऱ्हाट व मराठा अशीं रूपें कालान्तरानें झालीं. हीच व्युत्पत्ति समाधानकारक वाटते.

महाराष्ट्र हें नांव अत्यंत प्राचीन नाहीं हें खरें. पण तें ख्रिस्ती शकाच्या आरंभाइतकें तरी जुनें आहे. प्राचीन काळीं देशांचीं नांवें त्यांत वसाहत करणाऱ्या लोकांच्या नांवावरूनच पडत असत असें नाहीं. कारण महाराष्ट्रासारखेंच व त्याच्या इतकेंच जुनें सुराष्ट्र हें नांव प्राचीन कोरीव लेखांत 'सुरठ' या प्राकृत रूपानें आढळतें[१०].

पहिल्या पुलकेशीच्या काळीं तीन महाराष्ट्र ज्ञात होते ते विदर्भ, उत्तर महाराष्ट्र व कुन्तल किंवा दक्षिण महा-राष्ट्र हे होत. कल्चुरींचें राज्य या तीन्ही प्रदेशांवर होतें. तेव्हां त्यांना जिंकल्यावर पुलकेशी तीन महाराष्ट्रांचा स्वामी झाला. यांपैकीं दोन महाराष्ट्रांना विदर्भ व कुन्तल अशीं स्वतंत्र नांवें होतीं. उत्तर महाराष्ट्रांत मात्र अनेक लहान लहान देश होते. त्यापैकीं ऋषीक (खान-देश), अश्मक (गोदावरीच्या कांठचा प्रदेश), मूळक (पैठणाजवळचा प्रदेश) यांचा उल्लेख गौतमी बालश्री-च्या नाशिकच्या लेखांत आला आहे. या शिवाय गोपराष्ट्र[११] या सारखे राष्ट्रशब्दान्त प्रदेशहि त्यांत अन्त-र्भूत असावे. या सर्वांचा समावेश महाराष्ट्रांत करण्यांत आला. कुन्तल व विदर्भ यांनाहि महाराष्ट्र म्हणत असें राजशेखराच्या 'बालरामायणा'वरून दिसतें. कुन्तलांत प्राचीन काळीं कृष्णानदीच्या उत्तर खोऱ्याचा समावेश होई. कांहीं ठिकाणीं कुन्तलाचा विस्तार गोदावरीनदीपर्यंत होता असें म्हटलें आहे. सोड्ढलाच्या 'उदयसुन्दरीकथें'त (पृ. २१, ८३) 'कुन्तलेषु तटे गोदावरीति महासरितः प्रतिष्ठानं नाम नगरम्।' 'प्रतिष्ठाननगरीपरमेश्वरः कुन्तलानामधी-श्वरः' अशीं वर्णनें येतात. प्रतिष्ठान (पैठण) येथें राज्य करणाऱ्या सातवाहन राजांनाहि कांहीं ठिकाणीं

९. पट् (१ प.)चें प्रयोजकरूप. या अर्थाचा 'भूश्छेदीकृत्य' हा गंगताम्रपटांतील प्रयोग पहा. ए. इं., पु. ३, पृ. १२८. – कांहीं लेखांत 'छेद' हें 'पाटक' सारखें ग्रामनामाच्या शेवटीं येतें. आन्ध्रदेशांतील 'भुक्कुकुरच्छेद' हें ग्रामनाम पहा. ए. इं., पु. १४, पृ. ३६२.

१०. ए. इं., पु. ८, पृ. ६० इ. – भौगोलिक परिस्थितीवरूनहि देशनामें पडतात. 'अनूप' हें नांव व त्याची व्युत्पत्ति (पाणिनि, ६, ३, ९८) पहा.

११. हा प्रदेश नाशिकच्या पश्चिमेस होता. ए. इं, पु. २५, पृ. २३०.








' कुन्तलेश्वर ' म्हटलें आहे. कुन्तल हा प्रदेश महाराष्ट्र व कर्णाटक यांच्या सीमेवरचा असल्यानें त्याचा अन्तर्भाव कधीं महाराष्ट्रांत तर कधीं कर्णाटकांत होत असे. कालाच्या ओघांत देशांच्या सीमा बदलत असतात. उत्तरकालीन लेखांत कुन्तलदेशांत प्रामुख्यानें कर्णाटकी प्रदेशाचा अन्तर्भाव होत असे. बिल्हणाच्या ' विक्रमांकदेवचरितां'त कल्याणीच्या चालुक्य ( सहाव्या ) विक्रमादित्याला कधीं ' कुन्तलेन्द्र ' तर कधीं ' कर्णाटेन्दु ' असें म्हटलें आहे. सध्यांच्या बेळगांव जिल्ह्यासारखी त्याची स्थिति होती. तथापि त्यावरून कर्णाटक व महाराष्ट्र हे यादवकाळापर्यंत एकच मानले जात असत असें अनुमान करणें योग्य होणार नाहीं. हीच गोष्ट चिनी प्रवासी ह्यूएन्त्संग याच्या वर्णनाची. ह्यूएन्त्संग द्वितीय पुलकेशीला ' महाराष्ट्रनृपति ' म्हणतो. पुलकेशी हा तर वातापीपुरीचा– कर्णाटकांतील बदामीचा – राजा. तेव्हां या उल्लेखावरून नर्मदेपासून कावेरीपर्यंतच्या प्रदेशाला कधीं महाराष्ट्र तर कधीं कर्णाटक म्हणत असावे असें श्री. जोशी अनुमान करतात. पण तेंहि बरोबर दिसत नाहीं. ह्यूएन्त्संगच्या वर्णनावरून तो पुलकेशीला महाराष्ट्रांत कोठेंतरी – बहुधा नाशिकजवळ – भेटला असावा असें संशोधकांनीं अनुमान केलें आहे. कदाचित् नाशिक हीच पुलकेशीची दुसरी राजधानी असेल. तसें असल्यास त्यानें पुलकेशीला ' महाराष्ट्रनृपति ' म्हणून उल्लेखिलें यांत नवल नाहीं.

आतां विदर्भाला ' वऱ्हाड ' हें नांव कसें प्राप्त झालें याचा विचार करूं. वऱ्हाड हें नांव प्राचीन नाहीं हें मागें सांगितलें आहेच. प्राचीन काळीं या प्रदेशाचीं विदर्भ व क्रथकैशिक अशीं नांवें होतीं. हीं दोन्ही नांवें रघुवंशांत आलीं आहेत. विदर्भाचे अनेक जिल्हे होते त्यांचीं नांवें 'कट'शब्दान्त असत. उदाहरणार्थ बेन्नाकट ( वाइन–गंगेच्या दोन्ही तीरांवरचा प्रदेश ) याचा उल्लेख वाकाटक नृपति द्वितीय प्रवरसेनाच्या तिरोडी ताम्रपटांत[१२] आला आहे. या तऱ्हेचेच भोजकट[१३] ( अमरावती जिल्हा ) व नान्दीकट[१४] ( नान्देडजवळचा प्रदेश ) यांचाहि निर्देश वाकाटकांच्या ताम्रपटांत आढळतो. तसाच ' वरदाकट' असाहि एक जिल्हा प्राचीनकाळीं असावा. त्यांत वरदा ( सध्यांच्या वर्धा ) नदीच्या दोन्ही तीरांवरचा प्रदेश अन्तर्भूत होत असावा. कालान्तरानें 'कट'शब्दाचा अर्थ लोकांना समजेनासा झाल्यावर त्याला वरदातट म्हणूं लागले असें दिसतें. विदर्भाच्या अनेक जिल्ह्यांत याला महत्त्व प्राप्त झाल्यावर 'वरदातट' हें नांव विदर्भ या अर्थी प्रचलित झालें असावें. 'नलचम्पू' ( इ. स. चें दहावें शतक ) च्या खालील श्लोकांत ( ६, ६६ ) वरदातटाचा विदर्भदेश या अर्थी उल्लेख आला आहे :

' वीरपुरुषं तदेतद्वरदातटनामकं महाराष्ट्रम् ।
दक्षिणसरस्वती सा वहति विदर्भा नदी यत्र ॥ '

अबुल फाजलनेंहि वऱ्हाडचें वर्धातट असें जुनें नांव होतें असें म्हटलें आहे.[१५] तेव्हां वरदाकट–वरआअड–वराड–वऱ्हाड अशी या देशनामाची व्युत्पत्ति मानणें योग्य होईल.

**समस्या: २ : जुळीं भावंडें: मरहट्टे आणि कानडे.** महाराष्ट्र आणि कर्नाटक यांच्या निर्मितीस कारणीभूत झालेले मरहट्टे व कानडे हे प्राचीन काळीं एकाच प्रदेशांत जवळ जवळ राहत होते हें सिद्ध करण्याकरितां श्री. जोशी खालील पुरावा पुढें मांडतात :

"अशोकाच्या शिलालेखांत रिस्टिक व भोजक यांचा उल्लेख एकत्र आढळतो. भोज हे विदर्भांत राहत होते तर रिस्टिक हे खानदेशाच्या जवळपास राहात असावे. खानदेश याची कन्नदेश अशी व्युत्पत्ति आतां सर्वमान्य झाली आहे. या कन्न देशांत कानडी लोक वसाहत करून होते. सध्यांहि खानदेशांत कानड गवळ्यांची वस्ती आहे. खानदेशांतील हे राष्ट्रिक लोक मूळचे रहिवासी होत. हेच पुढें राष्ट्रकूट म्हणून प्रसिद्धीस आले. राष्ट्रकूट घराणें कर्णाटकीय होय असें डॉ. अळतेकरांचें निश्चित मत आहे. विदर्भातील रहिवासी हट्ट यांचें नांवहि कानडीच आहे. खिस्ती शकाच्या दुसऱ्या शतकानंतर कर्णाट-महाराष्ट्रीयांचा उल्लेख निःसंदिग्धपणें स्वतंत्र असा बऱ्याच काळापर्यंत मिळत नाहीं. जुन्या कोरीव लेखां-

१२. ए. इं., पु. २२, पृ. १७२. १३. फ्लीट, गुप्त इन्स्क्रिप्शन्स्, पृ. २३७.
१४. ए. इं., पु. २६, पृ. १५१.
१५. या. मा. काळे, 'वऱ्हाडचा इतिहास,' पृ. २३. वर्धा ही नदी ओहोळासारखी लहान नाहीं. कालिदासाच्या 'मालविकाग्निमित्रां'त विदर्भाचे दोन भाग दाखविण्याकरितां तिचा निर्देश केला आहे.



अनुक्रमणिका






[illegible] 'कर्णाटकांत' असा जोडशब्द येतो त्यावरून महाराष्ट्र [illegible] कर्णाटकांत समाविष्ट असलेला दिसतो. तेव्हां मरहट्टे [illegible] कानडे हे जुळी भावंडें होत. पुढें देवगिरि व हळेबिडु यादवांच्या यादवीपासून या दोघांमध्यें वितुष्ट येऊं लागून राज्याभिमानाला व प्रान्ताभिमानाला रंग चढूं लागला व पुढें अनेक घटनांनीं त्यांचा विभक्तपणा वाढूं लागला. ”

वरील प्रमेयांतील अनेक विधानें वादग्रस्त आहेत. मराठी व कानडी लोक खुद्द महाराष्ट्रांत एकत्र राहत नसले तरी महाराष्ट्र व कर्णाटक या लगतच्या प्रदेशांत राहत होते. पुष्कळदां हे प्रदेश एकाच राजवटींत समाविष्ट असत. तेव्हां त्यांचा परस्परांशीं निकट संबंध यावा, त्यांचें वाङ्मय परस्परांच्या वाचनांत यावें व त्यांच्या भाषांवर त्याचा परिणाम व्हावा यांत आश्चर्य नाहीं. मराठींत तसे कित्येक शब्द कानडींतून घेतले आहेत हें अनेकांनीं दाखविलें आहे. तथापि सध्या महाराष्ट्र म्हणून गणल्या गेलेल्या प्रदेशांत कानडी लोकांची वस्ती यादवकाळापर्यंत प्रामुख्यानें होती हें सिद्ध करण्यास पुरेसा पुरावा ग्रंथकर्त्यांनीं मांडला आहे असें वाटत नाहीं.

खानदेशाचें कन्नदेश हें नांव मुसलमानपूर्व काळांत प्रचलित होतें असें श्री. जोशी म्हणतात, पण त्याविषयीं पुरावा त्यांनीं दिलेला आढळला नाहीं. खानदेशाचें प्राचीन नांव ऋषिक किंवा ऋचिक होतें हें ते मान्य करतात.[१६] त्यानंतर सेउणदेश असें त्या प्रदेशाला नांव पडलें तें कोरीव लेखांत व हेमाद्रीच्या व्रतखंडांतील राजप्रशस्तींत आढळतें. पण कर्णाटांच्या प्राचीन काळच्या वसतीचें द्योतक असें कन्नदेश हें नांव मात्र प्राचीन कोरीव लेखांत मला दिसलें नाहीं.

राष्ट्रकूट हे खानदेशचे रहिवासी. ते कानडी होते म्हणून खानदेशांत प्राचीन काळीं कानडी भाषा प्रचलित होती हें अनुमानहि चिन्त्य आहे. प्राचीन ताम्रपटांत राष्ट्रकूट व ग्रामकूट यांच्यासह ग्रामीणजनांना राजांचा आदेश कळविला जात असे. देशाच्या विभागांना राष्ट्र अशी संज्ञा होती. ती केवळ कानडी मुलखांतच आढळते असें नसून दक्षिण-हिंदुस्थानाच्या सर्व भागांत आढळते.[१७] ग्रामांचे प्रमुख जसे ग्रामकूट तसे राष्ट्रांचे प्रमुख राष्ट्रकूट असत. यांतून पुढें कांहीं घराणीं महाराष्ट्राच्या निरनिराळ्या भागांत उदयास आलीं. सुमारें वीस वर्षांपूर्वी लिहिलेल्या आपल्या ‘राष्ट्रकूट आणि त्यांचा काळ’ या ग्रंथांत डॉ. अळतेकरांनीं राष्ट्रकूटांची भाषा कानडी होती असें विधान मुख्यतः खालील प्रमाणांवरून केलें होतें:—(१) त्यांच्या दरबारीं कानडी वाङ्मयाला उत्तेजन मिळालें. (२) गुजराथेंतील कर्क, ध्रुव इत्यादि सामंतांच्या सह्या दक्षिणच्या मूळ कानडी (proto-Canarese) लिपींत आहेत. – त्यानंतर गेल्या वीस वर्षांत राष्ट्रकूटांच्या इतिहासावर पुष्कळच नवीन प्रकाश पडला आहे. बदामीच्या चालुक्यांच्या उदयापूर्वी दक्षिणेंत राष्ट्रकूटांचें राज्य होतें हें डॉ. अळतेकरांना संमत नव्हतें पण अलीकडील संशोधनावरून सर्वांत जुनें राष्ट्रकूट घराणें कृष्णानदीच्या उत्तर खोऱ्यांत इ. स. च्या चौथ्या शतकांत उदयास आलें हें सिद्ध झालें आहे[१८]. त्यांचे ताम्रपट महाराष्ट्रांत कोल्हापूर, दौंड वगैरे ठिकाणीं सांपडले आहेत[१९]. यांची राजधानी मानपुर ही सातारा जिल्ह्यांतील माण असावी. हे राष्ट्रकूट वाकाटकांचे समकालीन होते. वाकाटकांशीं यांचीं कधीं युद्धें तर कधीं सोयरिकीही झाल्या होत्या. यांना वाकाटकांच्या लेखांत ‘कुन्तलेश’ असें म्हटलें आहे. कृष्णानदीच्या उत्तर खोऱ्याला कुन्तल अशी संज्ञा होती. तेव्हां हें घराणें महाराष्ट्रीय होतें असें मानण्यास हरकत नसावी. त्यानंतर कांहीं शतकांनीं दुसरें राष्ट्रकूट घराणें उदयास आलें. त्यांना मान्यखेटचे (किंवा मालखेडचे) राष्ट्रकूट म्हणतात. कारण पुढें त्यांची राजधानी मान्यखेड (हैद्राबाद संस्थानांतील मालखेड) येथें होती. मालखेड हें कानडी मुलुखांत

१६. याविषयीं सविस्तर विवेचन प्रस्तुत लेखकाच्या ‘ॲनल्स ऑफ दि भांडारकर इन्स्टिटयूट,’ पु. २५, पृ. १५९ इ. लेखांत पहा.

१७. छत्तीसगडांतील पूर्वराष्ट्र (फ्लीट, गु. इं. पृ. १९३) व आन्ध्रदेशांतील कूरकराष्ट्र (ए. इं., पु. १४, पृ. ३६२) यांचे उल्लेख पहा.

१८. प्रस्तुत लेखकाचा ‘मानपुरचे राष्ट्रकूट’ (ॲ. भां. इ., पु. २५, पृ. ३६) हा लेख पहा.

१९. ‘महाराष्ट्रांतील कांहीं प्राचीन ताम्रपट व शिलालेख’ (भा. इ. सं. मं.), पृ. १.












आहे. तेव्हां हें घराणें पुढें कर्णाटकीय गणलें गेलें तर आश्चर्य नाहीं. तथापि हें घराणें मूळचें महाराष्ट्रीय होय. याचे आरंभीचे लेख वेरूळजवळ सांपडले आहेत. हे स्वतःस कर्णाटकीय समजत नव्हते याला एक पुरावा देतां येईल. यांच्या आरंभींच्या कित्येक ताम्रपटांत या वंशाचा पहिला बलाढ्य नृपति दन्तिदुर्ग याच्याविषयीं खालील श्लोक आला आहे:[२०].

'काञ्चीशकेरलनराधिपचोलपाण्ड्य-
श्रीहर्षवज्रटविभेदविधानदक्षम् ।
कार्णाटकं बलमनन्तमजेयमन्यै-
र्भृत्यैः कियद्भिरपि यः सहसा जिगाय ॥'

यांत चालुक्यांच्या सैन्याला 'कार्णाटकं बलम्' असें म्हटलें आहे. दन्तिदुर्ग स्वतः कर्णाटकीय असता तर त्यानें पराजित केलेल्या चालुक्यांच्या सैन्याला 'कार्णाटक' असें विशेषण लावलें नसतें. या राष्ट्रकूटांची आरंभींची राजधानी मयूरखंडी ही नाशिकजवळील मोरखंड होय असें कांहीं विद्वानांचें मत आहे. पुढें मात्र पहिला अमोघवर्ष यानें माल्यखेट येथें राजधानी नेल्यावर राष्ट्रकूटांच्या दरबारीं कानडी वाङ्मयाला उत्तेजन मिळालें. तेथें कानडी मुलखांत वाढलेले राजपुत्र गुजराथेंत गेले असतां आपली सही आपणांस लहानपणापासून परिचित असलेल्या मूळ कानडी लिपींत करूं लागले तर त्यांत आश्चर्य नाहीं. तेव्हां नर्मदेपासून कावेरीपर्यंतच्या दक्षिणच्या भागाला कधीं महाराष्ट्र तर कधीं कर्णाटक म्हणत असत असें दिसत नाहीं.[२१]

कर्णाट व महाराष्ट्र हे एकच होत हें दाखविणारे कोरीव लेखांतील कांहीं उतारे श्री. जोशी यांनी उद्धृत केले आहेत ( पृ. १९९ ) तेहि निर्णायक मानतां येत नाहींत. या उताऱ्यांत कर्णाट व लाट यांचीं नांवें जवळ जवळ येतात म्हणून यांत लाट-( गुजराथ ) पासून कर्णाटापर्यंतचा प्रदेश अभिप्रेत आहे. मधल्या महाराष्ट्राचा निर्देश नाहीं म्हणून महाराष्ट्राचा कर्णाटकांत अन्तर्भाव होत असे, असें श्री. जोशी यांचें म्हणणें आहे. पण तें परीक्षणांत टिकत नाहीं. या उताऱ्यांत कर्णाट व लाट यांचीं नांवें जवळ जवळ आलीं असलीं तरी त्यांचा समास विवक्षित होता असें मानण्यास प्रमाण नाहीं. शिवाय हे सर्व उतारे पद्यांत आहेत. पद्यांत सर्वच गोष्टींचा अन्तर्भाव करणें शक्य नसतें. या उताऱ्यांतहि कर्णाट व लाट देशांबरोबर सेउणदेश ( सध्यांचा खानदेश व मराठवाडा ) व करहाट ( कऱ्हाड ) या देशांचा स्पष्ट निर्देश आहे. त्यांवरून महाराष्ट्रांचा सेउणदेश व करहाट एवढाच भाग कर्णाटकांत मोडत नव्हता असें अनुमान करणें योग्य होईल काय ?[२२]

"कर्णाटकीय वैशिष्ट्य दाखविणाऱ्या कांहीं गोष्टी महाराष्ट्रांत आढळतात. वीरगळ हें प्राचीन हट्टिजनांचें वैशिष्ट्य आहे. हे वीरगळ किंवा वीरपुरुषांच्या स्मारकशिला नाशिक जिल्ह्यांत पुष्कळ आहेत. त्यावरून नाशिक-खानदेश या भागास हट्टिकारांचें माहेरघरच म्हणणें अयोग्य होणार नाहीं" असें श्री. जोशी म्हणतात. पण अशा स्मारकशिला किंवा स्तंभ हिंदुस्थानच्या सर्व भागांत आढळतात. त्यांचें संस्कृत नांव यष्टि ( प्राकृत, यठी, लट्ठि ) होतें. यांचें सर्वात प्राचीन उदाहरण उत्तर हिंदुस्थानांतील पूर्वींच्या बहावलपूर संस्थानांत सुइविहार येथें सांपडलेल्या कनिष्ककालीन ताम्रपटांत आढळतें. एरणचा शिलास्तंभ – ज्यामध्यें सत्यनागाचा महाराष्ट्रीय म्हणून उल्लेख आहे तो – या प्रकारचाच स्मारकस्तंभ ( यष्टि ) आहे. अशा स्मारकशिला कच्छमध्यें अन्धौ येथेंहि सांपडल्या आहेत.[२३] गुजराथेंत त्यांना पालिया म्हणतात. महाराष्ट्रांत त्यांना सध्यां वीरगळ हें कानडी नांव असलें तरी अशा स्मारकशिला उभारणें हें केवळ हट्टिकारांचें वैशिष्ट्य होत असें

२०. ए. इं., पु. २३, पृ. १४.

२१. अलीकडे नागपूरजवळहि राष्ट्रकूटांचा इ. स. च्या सहाव्या शतकांतील ताम्रपट सांपडला आहे. – ए. इं., पु. २८, पृ. १.

२२. 'जित्वा चोलकलिंगसेवणबृहत्कर्णाटलाटाधिपान्' ( ए. इं. पु. ४, पृ. ८७ ) हें वर्णन काकतीय गणपति राजाच्या लेखांत येतें. याला सेउणदेशच्या ( देवगिरीच्या ) राजांचा चांगलाच परिचय असला पाहिजे. देवगिरीच्या यादवांनी याच्या पित्याला व चुलत्याला ठार मारलें होतें व याचाही पराभव केला होता. – ए. इं., पु. २५, पृ. २०२ पहा.

२२ कोनो, कॉर्पस् इन्स्क्रिप्शनस् इंडिकॅरम्, पु. २, पृ. १४१. २३. ए. इं. पु. १६, पृ. १९ इ.










म्हणतां येत नाहीं.

**समस्या : ३ : मरहट्टे व कानडे यांचे पूर्वज : पत्ति – यदु – तुर्वश.**

मरहट्टे यांच्या पूर्वपरंपरेविषयीं लिहितांना श्री. जोशी म्हणतात :

" मऱ्हाटी संस्कृति ही प्राचीन महाराष्ट्रांतील हट्टी जनांची संस्कृति. हे हट्टिजन आर्यांच्या पूर्वीपासून या देशांत होते. यांचें पूर्वीचें नांव ' पत्ति ' हें यजुर्वेदांतील रुद्राध्यायांत ' नम उच्चैर्घोषायाक्रंदयते पत्तीनां पतये नमः । ' या उताऱ्यांत येतें. वराहमिहिर पत्तिजनांचा उल्लेख करतो. हे ' पत्ति'च पुढें ' हट्टि ' झाले. कारण कानडींत पकाराच्या ऐवजीं हकार येतो. हेच पत्ति ऋग्वेदांत यदु, तुर्वश इत्यादि नांवानें येतात. यदु, तुर्वश हे ऋग्वेदांत ( ९,६२,२ ) आर्यशत्रु शंबराच्या पक्षांत येतात तेव्हां ते आर्येतर असावेत. याशिवाय अनु, द्रुह्यु, पूरु हीं तीन नांवें यदु व तुर्वश यांच्याबरोबर येतात. हीं सर्व एकाच घराण्याची मंडळी असावी. पूरु शब्दांत ऊरु हा द्रविडवर्गीय शब्द दिसतो. तेव्हां हे सर्व आर्येतर होत. डॉ. प्रिलस्की यांनीं अंधकवृष्णि यादववंश हा आर्येतर होता हें संस्कृत, पाली भाषेंतील पुराणें, नाना जातककथा वगैरेंच्या आधारानें सिद्ध केलें आहे. आजच्या मराठ्यांतील पुष्कळ कुळांचा संबंध यादववंशाशीं जाऊन पोंचतो. डॉ. अळतेकरांनीं अभिजात कर्णाटकीय म्हणून ठरविलेला राष्ट्रकूटवंश यादववंशीय सात्यकीशाखेपासून निघाला होता. कर्णाटकांतील गंग व विजयनगरचे राजे तुर्वसुवंशीय होते. तेव्हां मरहट्टे व कानडे यांचा यदुतुर्वसूंशीं अतिनिकट संबंध होता. "

महाराष्ट्रांतील मूळच्या हट्टजनांचे वेदकालीन पूर्वज ' पत्ति ' नामक लोक होते असें श्री. जोशी यांनीं अनेक ठिकाणीं म्हटलें आहे. त्याला आधार यजुर्वेदांतील वाक्य ' पत्तीनां पतये नमः ' हा एकच. वराहमिहिरानें पत्तिजनांचा निर्देश केला आहे असें त्यांनीं एके ठिकाणीं म्हटलें आहे ( पृ. ४७ ), पण त्याचा संदर्भ दिला नाहीं. वराहमिहिराच्या 'बृहत्संहिते'त अनेक देशांचा व जनांचा उल्लेख आहे. पण तींत पत्तींचें नांव मला दिसलें नाहीं. तेव्हां त्यांच्या प्रमेयाचा मुख्य पाया ' पत्तीनां पतये नम ' हें वाक्य होय. त्याचा थोडा विस्तारानें विचार करूं.

रुद्राध्यायांत रुद्राच्या एक किंवा अनेक रूपांचें विविध प्रकारांनीं वर्णन करून नमन केलें आहे. त्यामध्यें 'पत्तीनां पतये नमः' या खेरीज 'नमो अश्वेभ्योऽश्वपतिभ्यश्च वो नमः।' (३, १७), 'नमो रथेभ्यो रथपतिभ्यश्च वो नमः । ' (३, ९), नमः सेनाभ्यः सेनानिभ्यश्च वो नमः ( ४, १० ) इत्यादि नमनें येतात. या नमनांत ' पत्ति ' प्रमाणें अश्व, रथ, अश्वपति, रथपति, सेनानी, निषङ्गी, वर्मी, क्षत्तृ इत्यादि युद्धसंबंधी अनेक शब्द आढळतात. म्हणून सायणाचार्यांनीं पत्ति याचा ' पादचारी योद्धा' असा अर्थ केला आहे तोच योग्य दिसतो.[२४] अनेक युद्धविषयक शब्दांतून 'पत्ति' शब्द तेवढा निराळा काढून तो जनवाचक मानण्याचें कारण श्री. जोशी यांनीं कोठें सांगितलेलें आढळत नाहीं. कानडींत पकाराचा हकार होतो व मरहट्ट यांतील हट्ट किंवा हट्टिजनांचें पूर्वरूप पत्तिजन मानल्यास हें वचन उपयोगी पडेल असें पाहिल्यावर, त्यांना त्यांतील पत्ति हा शब्द जनवाचक आहे ही कल्पना सुचलेली दिसते.

' पत्ति ' हा शब्द आर्येतर जनांचा वाचक असता तर तो ऋग्वेदांत दास, दस्यु इत्यादि शब्दांप्रमाणें यावयास पाहिजे होता. पण सबंध ऋग्वेदांत पत्तिशब्द याच काय पण इतर कोणत्याहि अर्थानें आलेला आढळत नाहीं.

ऋग्वेदांत आर्येतर जनांचा निर्देश पत्ति म्हणून आला नसला तरी यदु, तुर्वश, द्रुह्यु, अनु व पूरु या नांवानें येतो असें श्री. जोशी म्हणतात त्याचा आतां विचार करूं.

या जनांचा उल्लेख ऋग्वेदांत दाशराज्ञ युद्धाच्या वर्णनांत व इतरत्र अनेक ठिकाणीं येतो. परुष्णी ( रावी- )-च्या तीरावर भरतवंशी सुदासाचे दहा राजांशीं युद्ध झालें. ते दहा राजे अलिन्, पकथ, भलानस, शिव, विषाणिन्, अनु, द्रुह्यु, तुर्वश, यदु व पूरु हे होत. यांपैकीं पहिल्या पांच राजांचीं नावें इतरत्र क्वचितच येतात, पण शेवटच्या पांच राजांचा उल्लेख ' पंचजनाः ' या शब्दानें ऋग्वेदांत कांहीं ठिकाणीं आला आहे असें मानण्यांत येतें. हे दहाहि राजे आर्य होते

२४. दुसरा टीकाकार भट्टभास्कर यानें पत्ति याचा अर्थ ' एक रथ, एक हत्ती, तीन घोडे व पांच सैनिक' असाहि सुचविला आहे.








असें विद्वानांचें मत आहे.[२५] याशिवाय अज, शिग्रु व यक्षु या तीन टोळयांनीं भेद नांवाच्या राजाच्या आधिपत्याखालीं सुदासबरोबर यमुनेच्या कांठीं युद्ध केलें. या टोळ्या मात्र आर्येतरांच्या असाव्या असें प्रचलित मत आहे.

यदुतुर्वशांना आर्येतर मानण्याचें समाधानकारक कारण श्री. जोशी यांनीं दिलें नाहीं. एके ठिकाणीं यदु व तुर्वश यांचीं नांवें आर्यशत्रु शंबराबरोबर गोंवलीं गेलीं आहेत ( ऋ. ९, ६२, २ ) त्यावरून ते आर्येतर असावेत असें अनुमान ते करतात पण तें सयुक्तिक भासत नाहीं. सुदासाच्या शत्रूंमध्यें अनार्यांबरोबर आर्यहि होते असें ऋग्वेदांतील ( ७, १८, ५ – १९ ) दाशराज्ञयुद्धाच्या वर्णनावरून दिसतें. व म्हणूनच कांहीं ठिकाणीं ( ऋ. ७, ८३, १ ) दास व वृत्राबरोबर आर्यांचाही निःपात करून सुदासाचें रक्षण करण्याविषयीं वसिष्ठांनीं इंद्रवरुणांची प्रार्थना केली आहे.

संस्कृत पुराणें व पाली जातकादि ग्रंथ यांवरून अन्धकवृष्णि यादवांची परंपरा आर्येतर असावी असा सिद्धान्त डॉ. प्रिलस्की यांनीं काढला आहे असें श्री. जोशी सांगतात. पण त्यांचीं प्रमाणें त्यांनीं दिलीं नसल्यामुळें त्यांची चर्चा येथें करतां येत नाहीं. शिवाय ऋग्वेदकालीन जनांचें आर्यानार्यत्व ठरविण्यास त्यानंतर हजारों वर्षांनीं रचलेल्या पुराण-जातकादि ग्रंथांचा उपयोग करणें योग्य होणार नाहीं. हे प्रश्न ऋग्वेदादि वैदिक ग्रंथांतील वचनांवरूनच सोडविले पाहिजेत. यदु, तुर्वश, अनु, द्रुह्यु व पूरु हे आर्येतर असते तर त्यांचें पौरोहित्य वैदिक ऋषींनीं कसें केलें असतें ? यदूंचें पौरोहित्य कण्वांकडे व द्रुह्यूंचें भृगूंकडे होतें[२६]. तेव्हां यदु, तुर्वश आदि जन आर्यच होते यांत संशय नाहीं.

उत्तरकालीन राष्ट्रकूट राजे आपण यदूच्या वंशांत आणि गंग व विजयनगरचे राजे आपण तुर्वशाच्या वंशांत जन्मलों असें आपल्या दानपत्रांत सांगण्यांत भूषण मानूं लागले. यदु व तुर्वश हे जन आर्येतर नव्हते हें वर दाखविलें असल्यामुळें या प्रमाणाचा प्रस्तुत प्रश्नांशीं कांहीं संबंध येत नाहीं. वास्तविक पाहतां या उत्तरकालीन वंशावळींच्या वर्णनावर फारशी भिस्त ठेवतां येत नाहीं. इ. स. च्या सातव्या-आठव्या शतकापासून उत्तर तसेंच दक्षिण हिंदुस्थानांतील राजे सूर्य, चंद्र, अग्नि या सारखे देव, रघु, कर्ण, सात्यकि या सारखे पुराणप्रसिद्ध योद्धे, भारद्वाजासारखे ऋषि यांपासून निघालेल्या वंशांत आपण जन्मलों असें सांगण्यांत भूषण मानूं लागले.[२७] उदाहरणार्थ, गुजराथेंतील गुर्जर राजे आपल्या आरंभींच्या ताम्रपटांत आपल्या गुर्जरवंशाचा अभिमानानें उल्लेख करीत, पण इ. स. ६७५ च्या ताम्रपटांत या वंशाचा तिसरा दद्द राजा हा आपला वंश महाराज कर्ण याच्यापासून निघाला असें सांगतो. हीच स्थिति राष्ट्रकूटांच्या ताम्रपटांत दिसते. सन ८७१ च्या संजान ताम्रपटांत, राष्ट्रकूट वंश यदूपासून निघाला, असें विधान प्रथमच केलें आहे. तेव्हां या उत्तरकालीन काल्पनिक वर्णनावरून राष्ट्रकूट व गंग हे यदु व तुर्वश या वंशांत जन्मले होते हें म्हणणें धाडसाचें होणार आहे.

येथवर श्री. जोशी यांच्या ग्रंथांतील मुख्य प्रमेयांचें परीक्षण उपलब्ध साधनांच्या साहाय्यानें केलें. त्यांच्या ग्रंथांतील देव-देवता, धर्मपंथ इत्यादि इतर भागांतील विषयांसंबंधीहि थोडेबहुत लिहिण्यासारखें आहे. पण हा लेख प्रमाणाबाहेर वाढल्यामुळें त्यांची चर्चा येथें करीत नाहीं.

आपल्या संस्कृतीचें संपूर्ण दर्शन – विशेषतः प्रागैतिहासिक कालांतील संस्कृतीचें ज्ञान केवळ शिलालेख, ताम्रपटादि साधनांवरून होणें शक्य नाहीं हें खरें आहे. या ज्ञानाकरितां भाषा, धर्म, देवदेवकें, चालीरीती यांचा उपयोग अवश्य केला पाहिजे. पण या इतर साधनांवरून अनुमानें करतांना तीं शिलालेख– ताम्रपटादि अव्वल दर्जाच्या साधनांपासून प्राप्त होणाऱ्या ज्ञानाशीं

२५. ' केंब्रिज् हिस्टरी ऑफ् इंडिया ', पु. १, पृ. ८१.

२६. दाशराज्ञयुद्धांत द्रुह्यूंबरोबर भृगूहि होते. भृगु पुरोहितकुल होतें याविषयीं तरी संशय नसावा.

२७. बिल्हण कवि आपल्या 'विक्रमाङ्कदेवचरितां'त चालुक्यवंशाचा मूळ पुरुष ब्रह्मदेवाच्या संध्यासमयींच्या चुलुकांतून ( ओंजळींतील पाण्यांतून ) उत्पन्न झाला असें वर्णन करतो. एका शिलालेखांत तो भारद्वाज ऋषीच्या चुलुकांतून निघाला असें वर्णन आहे. हीं सर्व वर्णनें काल्पनिक आहेत हें सांगण्याचें कारण नाहीं. पण या राजवंशांना 'तुम्ही आर्येतर वंशांतले आहां' हें सांगणें कितपत रुचलें असतें याची शंका आहे.






विसंगत होत नाहींतना हें पाहण्याचीहि काळजी घेतली पाहिजे. शिलालेख-ताम्रपटादि साधनेंहि सर्वच बाबतींत निश्वसनीय असत नाहींत. त्यांतील माहितीचा पडताळा अन्य साधनांवरून पहावा लागतो. नवीं साधनें उजेडांत आल्यावर अनेकदां पूर्वीच्या अनुमानांत फरक करावा लागतो. सर्व साधनांचा तारतम्यानें उपयोग करून सत्याचा आविष्कार करण्यास झटणें एवढेंच आपल्या हातीं आहे.

श्री. जोशी यांच्याशीं अनेक ठिकाणीं आम्ही मतभेद दर्शविला असला तरी त्यांच्या अपार परिश्रमांबद्दल व भाषा, ग्रामनामें, चालीरीती, धर्मपंथ इत्यादि साधनांतून प्राचीन संस्कृतीचें दर्शन घडवून आणण्याच्या त्यांच्या कौशल्याबद्दल आम्हांस अत्यंत आदर आहे. त्यांचें पुस्तक अत्यंत उद्बोधक व विचारांस चालना देणारें झालें आहे यांत संशय नाहीं.

---

श्री. वा. अ. खलप

## " राष्ट्रकूट–प्रमुखान् कुटुम्बिनः "

**श्री. शं. वा. जोशी यांच्या "मऱ्हाटी संस्कृति– कांहीं समस्या "** यांत पान ७६ वर हिंदुस्थान सरकारच्या शिलालेख-संग्रह करणाऱ्या शाखेचे मुख्याधिकारी श्री. एच्. कृष्णराव यांचें " राष्ट्रकुट-प्रमुखान् कुटुंबिनः " या वाक्यावर एक टिपण आहे:

" The familiar phrase राष्ट्रकुट-प्रमुखान् कुटुम्बिनः, which occurs in copper-plate inscriptions, shows also that the Rashtrakūtas were कुटुंबिनः i. e. cultivators, who enjoyed a higher social status than others of their community " (Epigraphia Indica XI pp. 342–343. )

" कुटुम्बिनः' हा शब्द द्राविड भाषावर्गीय मूळ भाषेंतून बनला असावा, असा कांहीं विद्वानांचा तर्क आहे. यांतील मूळ शब्द ' कुडु ' म्हणजे कुळ ( शेतकरी ) असा आहे. ' कुडु-वोक्कलिग ' या जोडशब्दांत दोन्ही समानार्थी पदें आहेत. ' कुडु ' शब्दांत येथें वरील अर्थ अभिप्रेत आहेत. ' कुडुव ' यावरूनच कुणबी शब्द प्रचारांत आला असावा असें मला वाटतें. कुणबी हा शब्द कुळ यापासून निष्पन्न झाला असणें जास्त संभवनीय आहे असें आपलें मत रा. अत्रे यांनीं ' गांवगाड्यां'त नमूद केलें आहे. या सर्व आनुषंगिक पुराव्यावरून श्री. कृष्णराव यांनीं स्वतंत्रपणें शिलालेखांतील संदर्भावरून केलेला अर्थ यथोचित आहे असें म्हणावें लागतें "

हा उतारा विस्तृतपणें देण्याचें कारण खरी वस्तुस्थिति काय आहे ती समजावी. श्री. जोशी यांची अशी कल्पना झाली आहे कीं " राष्ट्रकूट-प्रमुखान् कुटुंबिनः " या वाक्याचा अर्थ श्री. कृष्णराव यांनीं केला आहे. परंतु तो श्री. कृष्णराव यांनीं केला नसून तो श्री. एच्. कृष्णशास्त्री, बी. ए., यांनीं Malepadu Plates of Punyas Kumara; The fifth year of his reign या विषयावर निबंध लिहिला आहे त्यांत त्यांनीं ३४३ व्या पानांवर 'राष्ट्रकूट-प्रमुखान् कुटुंबिनः' यावर जो आपला अभिप्राय दिला आहे त्यांत आला हें वाक्य त्यांनीं कुठून काढलें हे त्यांत दिलें नाहीं. त्या अभिप्रायाचा उतारा वर श्री. कृष्णराव यांनीं दिलेला आहे. त्यांच्या टिपणावर विसंबून राहिल्यामुळें श्री. जोशी यांचा गैरसमज झाला असावा.

खिस्तवासी श्री. Filipe Nery Xavier या गोमांतकीय गृहस्थानें Bosquejo Historico Das Communidades De Goa ( 'गोमांतकांतील ग्रामसंस्थांची ऐतिहासिक रूपरेषा' ) या नांवाचा ग्रंथ लिहिला आहे त्यांतील नामकोशांत ( Glossary ) पुढील शब्द मिळतो:

Cutubana किंवा Kuttumbana











याचा पोर्तुगिजींत अर्थः T e r r a D a d a Para Alimentacao Dos Moradores Da Aldea, Mediante FenSao Certa. याचा मराठींत अर्थः कुटुंबण ( कटुपण ) किंवा कुटुंबन-गांवच्या रहिवाशांना त्यांच्या अन्नाकरितां ( आहार-पोषणाकरितां) निश्चित वार्षिक ( pension, annuity ) रक्कम घेऊन दिलेली जमीन.

कोंकणी भाषेंत " कटुपण, कटुबन, कुटुंबिन " किंवा पोर्तुगीज भाषेंत Aforamento,, Fatiota किंवा E m p h y t e u s i s अशीं नांवें आहेत. Emphyteusis — a long or perpetual lease for a modical rent. कटुबण, कटुंबीन Fatiot, A f o r a m e n t o, Emphyteusis मध्यें कायमच्या करारानें दिलेली जमीन, केव्हां केव्हां करारांत यावच्चंद्रदिवाकरौ अथवा चंद्र-सूर्य असेपर्यंत असे शब्द लिहिले जात असतात.

कायम चिठ्ठीनें किंवा पट्ट्यानें जमीन देण्याची पद्धत व कटुपण, कटुंबण हीं नावें गोव्यांतच आहेत असें नाहीं. त्याच्या शेजारील वेंगुर्लें, मालवण, रत्नागिरि वगैरे भागांतहि आहेत. [ श्री दत्ताराम गणेश गंवडळकर, (सावंतवाडी),सगुण बाळकृष्ण काणेकर,(मसुरें, मालवण) किंवा गोव्यांतील रा. ना. केळकर ( माद्रे ) श्री. सगुण प्र. मोथे , गोमांतकांतील जमीनमोजणीखात्यांतील माजी अधिकारी यांस या बाबतींत विचारलें असतां ही पद्धत व नांवासंबंधीं त्यांचीं होकारार्थी उत्तरें आलीं.]

आमचे मित्र, सुप्रसिद्ध इतिहासकार श्री. पांडुरंगराव सखाराम पिसुर्लेकर,( गोमांतकांतील सरकारी दप्तर खात्याचे अधिकारी ) यांनीं अधिकृतरीत्या ( officially ) एक लेख लिहून दिला आहे. त्यांत गोमांतकांतील म्हापसें गांवच्या ग्रामसंस्थेच्या १५८७ ते १६०८ सालांतील कारभाराविषयीं माहिती दिली आहे. त्यांत खलप ( कालप ) घराण्यांतील कांहीं व्यक्तींनीं भाग घेतल्याचें दिसून येतें. " कटुबण ( Fatiota ) पद्धतीनें ग्रामसंस्थेनें दिलेल्या जमिनीच्या रकमेचा वसूल करून ती गांवकऱ्यांत वाटली ( विभागली )" असें त्यांनीं लिहिलें आहे. यावरून असें दिसतें कीं वरील पद्धतीनें ह्या कालांतहि ग्रामसंस्था आपल्या जमिनी कायम परंपरेनें देत असत.

## काय हवें मज, मला कळेना —!

रूक्ष जगाच्या रेताडांतच
 रूतून जातीं नित्य पाउलें
तरल मनांतिल संकल्पांचीं
 ' अहं ' भोंवतीं उभीं वारुळें !

उत्कटतेच्या तव सुरईंतुन
 मद्य प्राशुनि झिंगुन येतों
प्रमत्ततेच्या बुरुजावरुनी
 व्यवहाराला विदीर्ण करितों

टाकुन दाहक लाचारी ही
 मिठी मारितों कधि ध्येयाला
पायीं तुडवुन तीं अप्राप्यें
 कधी वेंचतों अभिमानाला

' वाल्या कोळया ' वरील श्रद्धा
 तिथेंच विरते. दूर वाल्मिकी !
' वाल्या 'पासुन ' वाल्मीकी 'च्या
 भ्रमिष्ट वाटा. गुंतागंती !

अगणित मूल्यें, तशींच स्वप्नें
 फेर धरूनी इथें नाचतीं
अर्धी-अधिक ज्योति जळाली
 अजून भाषा ' नेऽति ' ' नेऽति ' !

तत्त्वज्ञांना तळमळ माझी
 कशी वर्णुनी सांगूं, दावूं ?
अंतरांतल्या आक्रोशाला
 सांग कसा अन् लगाम लावूं ?

एकच वांच्छा जगल्यांची ही
 जळते, जाळित क्षणाक्षणांना
मनांत माझ्या तसाच संभ्रम
 काय हवें मज, मला कळेना !

— मधुकर जावडेकर

श्री. भास्कर महादेव काळे

# पंचवार्षिक योजना : प्रगतीच्या मार्गांतील अडचणी

स्वतंत्र भारताची पहिली पंचावार्षिक योजना सुरू होऊन दोन वर्षे पांच महिने पूर्ण झाले आहेत. जून १९५६ अखेर योजनेची अंमलबजावणी पूर्ण झाली पाहिजे. सुरवातीचें पहिलें वर्ष हें कार्यक्रमाची पूर्व-तयारी करण्यांत गेलें व योजनेचा पक्का किंवा दुरुस्त आराखडा योजनेला सुरवात झाल्यावर सुमारें दीड वर्षानें गेल्या डिसेंबरमध्यें प्रसिद्ध झाला. योजनेचा एक महत्त्वाचा भाग 'ग्रामीणविकासयोजना' यालाहि सुरुवात २ ऑक्टोबर १९५२ रोजीं झाली. यामुळें पहिल्या दीड-दोन वर्षांत योजनेची किती प्रगति झाली या गोष्टीकडे सामान्य जनतेचें लक्ष फारसें गेलें नाहीं. परंतु आतां योजनेच्या कार्यक्रमाला २। वर्षे पूर्ण झाल्यामुळें योजनेची प्रगति कितपत होत आहे या गोष्टीकडे जास्त लक्ष साहजिकच जाऊं लागलें आहे. श्री. गुल्झारिलाल नंदा यांनीं योजनेच्या पहिल्या दोन वर्षांच्या प्रगतीचा आढावा पार्लमेंटला कांहीं महिन्यां-पूर्वी सादर केला. अगदीं अलीकडे ग्रामीण विकास-योजनांच्या कार्यांत किती प्रगति झाली याबद्दल माहिती प्रसिद्ध झाली आहे व ऑक्टोबर १९५३ पासून आणखी कांहीं ठिकाणीं ग्रामीण विकास योजनांना सुरवात करण्यांत आली आहे. अर्थमंत्री श्री. देशमुख यांनींहि अलीकडे योजनेच्या प्रगतीबद्दल कांहीं विचार व्यक्त केले आहेत. पहिल्या दोन वर्षांत एकूण रु. २०६९ कोटी खर्चांपैकीं ३० टक्के खर्च झाला व बाकीचा खर्च राहिलेल्या तीन वर्षांत व्हावयाचा आहे. शेतीचें उत्पादन सुधारत आहे, पाटबंधाऱ्यांच्या मोठाल्या कामांची प्रगति अंदाजाप्रमाणें होत आहे व कांहीं खाजगी उद्योगधंद्यांत अपेक्षेप्रमाणें उत्पादन सुधारलें आहे. परंतु कांहीं उद्योगधंद्यांत प्रमुख अड-चणी चालू वर्षी निर्माण झाल्या आहेत व अंतर्गत आणि परराष्ट्रीय व्यापार यांच्या बाबतींत अडचणी उद्भवल्या आहेत. त्यांतच सुशिक्षितांतील बेकारांचा आंकडा सुमारें ५ लक्षांपर्यंत वाढला आहे. व्यापारी व कारखानदार, उद्योगधंद्यांच्या विकासाला पोषक वातावरण नाहीं अशा तक्रारी अलिकडे वारंवार करीत आहेत. सामान्य जनतेची क्रयशक्ति वाढत्या महागाई-मुळें घटत चालली आहे व याचाहि आर्थिक परि-स्थितीवर अनिष्ट परिणाम होत आहे. आंतरराष्ट्रीय शांतता व अमेरिकन सरकारचें इतर गरजू राष्ट्रांना मदत देण्याच्या बाबतींत थोडेसें बदललेलें धोरण यांचाहि परिणाम भारताला आर्थिक दृष्ट्या सोसावा लागत आहे. अशा तऱ्हेचें वातावरण सध्यां असल्यामुळें पंचवार्षिक योजनेच्या प्रगतीच्या मार्गांत कोणत्या प्रमुख अडचणी दिसून येतात याबद्दल थोडक्यांत विचार करणें उद्बोधक ठरेल.

प्रस्तुत लेखांत पंचवार्षिक योजनेच्या अंमलबजावणी-साठीं प्रत्यक्ष सरकारकडून कोणत्या गोष्टींची किंवा कशा प्रकारच्या यंत्रणेची आवश्यकता आहे याचा विचार प्रथम केला आहे. त्यानंतर आर्थिक दृष्ट्या योजनेच्या कार्यांत मूलभूत अडचणी कोणत्या आहेत याचा थोडक्यांत विचार केला आहे. नंतर योजनेच्या यशासाठीं गृहीत धरलेल्या कांहीं गोष्टींच्या बाबतींत आज १९५३ सालीं कोणता अनुभव येत आहे व कशी परिस्थिति आहे या-बद्दल जरा विस्तारानें विवेचन केलें आहे. कारण या गोष्टी बऱ्याच प्रमाणांत अगदीं अलीकडच्या परिस्थिती-मुळें उद्भवल्या असून खुद्द नियोजनमंडळालाहि या अडचणींच्या स्वरूपाबद्दल निश्चित कल्पना नसावी. शेवटीं या अनेक प्रकारच्या अडचणींतून कांहीं मार्ग निघण्यासारखा आहे किंवा नाहीं याबद्दलहि थोडक्यांत विचार केला आहे.

## सरकारी यंत्रणा

नियोजन यशस्वी करण्यासाठीं सरकारकडून नेमले जाणारे अधिकारी उच्च दर्जाचे व कार्यक्षम असावेत अशी अपेक्षा आहे. सामान्य जनतेच्या अडचणी समजावून घेऊन व जनतेचा विश्वास संपादन करून सरकारी अधि-काऱ्यांनीं आपलें काम केलें पाहिजे. ग्रामीण विकास-








योजनांचें कार्य, सार्वजनिक स्वरूपाची कर्जउभारणी, बचतयोजना व लोकांकडून विनामूल्य मिळणारी श्रमशक्ति या सर्वांच्या बाबतींत त्या त्या कामाशीं संबद्ध असलेल्या सरकारी अधिकाऱ्यांचें काम अगदीं महत्त्वाचें आहे. योजनेसाठीं नेमण्यांत आलेले सर्व अधिकारी कार्यक्षम असतील व जनतेचा विश्वास त्यांना संपादन करतां येत असेल तरच पुष्कळशा बाबतींत यश येण्याची शक्यता आहे. मद्रास प्रांतांत जुलैमहिन्यांत सामान्य जनतेकडून कर्ज मिळूं शकलें याला कारण सरकारी अधिकाऱ्यांनीं विशिष्ट तऱ्हेनें सामान्य जनतेला केलेली विनंति होय. परंतु मद्रासमध्यें ज्या प्रकारचें कर्ज-उभारणीच्या योजनेला यश आलें तसें यश इतर ठिकाणीं आल्याचें ऐकिवांत नाहीं. ग्रामीण विकासयोजनांच्या बाबतींत प्रथम स्थानिक जनतेशीं विचारविनिमय करून कार्यक्रमाची दिशा ठरविली पाहिजे. परंतु जनतेला काय पाहिजे आहे हें विचारांत न घेतां स्वतः योजनेच्या अधिकाऱ्यांनीं एखादा कार्यक्रम आंखला तर तो यशस्वी होणार नाहीं. असा कांहींसा अनुभव कर्जतविकासयोजनेच्या बाबतींत आला आहे. कांहीं ठिकाणीं कार्यक्रम आंखून तयार झाला परंतु पैसा वेळेवर मंजूर न झाल्यामुळें कार्यक्रम लांबणीवर पडला असाहि अनुभव आहे. विशेषतः ग्रामीणविकासयोजनांचा ( उ० सुधारलेल्या बीं- बियाण्यासाठी पैसा, खतांसाठीं पैसा, विहीर बांधण्यासाठीं पैसा इ० गोष्टी) पुष्कळसा कार्यक्रम अशा स्वरूपाचा आहे कीं त्यासाठीं पैसा अगदीं त्वरित मंजूर झाला पाहिजे. अशा प्रकारच्या प्रत्येक बाबतींत पैसा मिळूं शकेल तरच उत्साहानें कार्य होतें, नाहींतर कार्यक्रम एक वर्ष लांबणीवर पडून लोकांचा उत्साहहि नष्ट होतो. खेडेगांवांतून योग्य प्रकारें कार्य करण्यास पगारी नोकर मिळत नाहींत असा उल्लेख ऑक्टोबर महिन्याच्या सुरुवातीला अर्थमंत्री श्री. देशमुख यांनीं केला. योजनेच्या यशासाठीं सरकारी यंत्रणा कार्यक्षम असणें जरूर आहे. ज्या प्रमाणें 'अधिक धान्य पिकवा' ही मोहीम ग्रामीण जनतेशीं प्रत्यक्ष जाऊन न पोंचल्यामुळें व्हावी तितकी यशस्वी झाली नाहीं, त्याचप्रमाणें पंचवार्षिक योजनेचा कार्यक्रम जनतेच्या जीवनापर्यंत व्यक्तिशः न पोंचल्यामुळें तो व्हावा तितका यशस्वी होईल किंवा नाहीं याबद्दल किंचित् शंका वाटूं लागली आहे. पाटबंधाऱ्यांच्या लहानलहान योजना यशस्वी व्हावयाच्या तर त्याबाबतींत जनतेचा उत्साह प्रथम जागृत झाला पाहिजे व जबाबदार अधिकाऱ्यांनीं या योजना त्वरित पार पाडण्याची दक्षता बाळगली पाहिजे.

## कांहीं मूलभूत अडचणी

पंचवार्षिक योजनेच्या कार्यक्रमाच्या दृष्टीनें आर्थिक दृष्ट्या दोन मूलभूत अडचणी आहेत. पहिली अडचण अशी कीं आपल्या देशांत मूलभूत उद्योगधंद्यांचा जवळ जवळ अभाव आहे. त्यामुळें यंत्रांचें उत्पादन आपणांला अजूनहि करतां येत नाहीं व बहुतेक सर्व प्रकारच्या यंत्रसामग्रीसाठीं आपणांला परदेशांवर अवलंबून राहावें लागतें. मोटारींचीं व आगबोटींचीं एंजिनें आपल्या देशांत तयार होत नाहींत. पोलादाचें उत्पादनहि वाढविण्याच्या बाबतींत अनेक अडचणी आहेत. वाहतुकीच्या दृष्टीनें विचार केला असतां रेल्वेच्या वॅगन्सहि जरूर त्या प्रमाणांत बांधून पुऱ्या होत नाहींत असा अगदीं अलीकडचा अनुभव आहे. जहाजांचें टनेजहि पंचवार्षिक योजनेच्या अपेक्षेप्रमाणें पूर्ण होणार नाहीं अशी तक्रार ऑक्टोबरच्या सुरुवातीस जहाजधंद्यांतील अनुभवी तज्ज्ञ श्री. एम्. ए. मास्टर यांनीं केली. आपल्या देशांत उद्योगधंद्यांचा अभाव असल्यामुळें औद्योगिक प्रगति होऊं शकत नाहीं असा इषारा सर विश्वेश्वरय्या यांनीं आपल्या भाषणांतून अनेक वेळां दिला आहे. लष्करी संरक्षणाचें साहित्य, विमानें, जहाजें व मोटारी, विजेच्या निर्मितीसाठीं यंत्रसामग्री, कापड, सिमेंट व साखर इ० कारखान्यांसाठीं लागणारी यंत्रसामग्री या सर्व बाबतींत आपण परदेशांवर अवलंबून असल्यामुळें पंचवार्षिक योजनेच्या कार्यक्रमांतहि अपेक्षेप्रमाणें कांहीं मूलभूत धंद्यांच्या बाबतींत व इतर बाबतींत प्रगति होऊं शकत नाहीं, व परदेशच्या यंत्रसामग्रीच्या आयातीवर वाजवीपेक्षां जास्त पैसा खर्च करावा लागतो. पंचवार्षिक योजनेवर अर्थशास्त्रज्ञांनीं व कारखानदारांनीं केलेल्या टीकेमध्यें मूलभूत उद्योगधंद्यांकडे जरूर तें लक्ष योजनेनें पुरविलेलें नाहीं, अशी महत्त्वाची टीका होती. योजनेनें या महत्त्वाच्या गोष्टीकडे जरूर तें लक्ष दिलें नाहीं. मूलभूत उद्योगधंद्यांचा अभाव ही गोष्ट औद्योगिक प्रगतीच्या दृष्टीनें अतिशय अडचणीची ठरत आहे.

मूलभूत आर्थिक परिस्थितीच्या दृष्टीनें दुसरी अड-










चण म्हणजे दर वर्षी १। टक्का किंवा ४० लक्ष या प्रमाणांत वाढत जाणारी आपली लोकसंख्या होय. नियोजनाच्या पांच वर्षांच्या काळांत आपली लोकसंख्या दोन कोटींनीं वाढेल. वाढत्या लोकसंख्येसाठींच दरवर्षी निदान ८ ते १० लक्ष नवीन नोकऱ्या निर्माण केल्या पाहिजेत. देशांतील सर्वसामान्य जनतेचें राहणीचें मान अतिशय हलक्या दर्जाचें असल्यामुळें दरवर्षी ४० लक्ष ही लोकसंख्येची वाढ आपल्या देशाला आर्थिक दृष्ट्या पेलण्यासारखी नाहीं. म्हणूनच नियोजनमंडळानें कुटुंब-नियोजनाच्या प्रश्नाकडे लक्ष वेधविलें आहे व या कार्याच्या प्रचारासाठीं रु. ६५ लक्ष खर्चाची तरतूद केली आहे. गेल्या ८० वर्षांत आपल्या देशांतील लोकसंख्येची भरपूर वाढ झाली आहे. १८७० मध्यें अखंड हिंदुस्थानची लोकसंख्या २० कोटी होती ती १९४१ मध्यें ३८ कोटीवर जाऊन, सध्यां भारत व पाकिस्तान मिळून लोकसंख्या ४३ कोटींवर गेली आहे. हिंदी संघराज्याची लोकसंख्या सध्यां सुमारें ३६ कोटी आहे. आपला देश जगांतील दाट लोकवस्तीच्या देशांत मोडतो. आर्थिक दृष्ट्या या पुढें आपली लोकसंख्या स्थिर रहाणें आवश्यक आहे. आपलें राष्ट्रीय उत्पन्न दर माणशीं वर्षाला सुमारें रु. २५० आहे. एवढ्या कमी उत्पन्नामुळें वैयक्तिक विकासहि आर्थिक दृष्ट्या शक्य होत नाहीं. तेव्हां लोकसंख्येच्या वाढीचें प्रमाण ही गोष्ट आपल्या आर्थिक जीवनांतील एक मूलभूत अडचण आहे.

### जनतेचा उत्साह

पंचवार्षिक योजनेच्या कार्यक्रमाच्या कित्येक बाजू अशा आहेत कीं सर्वसामान्य जनतेंत त्यासंबंधीं उत्साह व आपुलकी दिसून आल्याशिवाय त्या पूर्णपणें पार पाडतां येणार नाहींत. उ०, ग्रामीण विकासयोजनांच्या बहुतेक बाबी अशा आहेत कीं केवळ पैसा खर्च करून त्यामुळें कार्य यशस्वी होणार नाहीं. जनतेचा उत्साह, आपलेपणा, संपूर्ण सहकार्य व कांहीं बाबतींत विनामूल्य श्रमशक्ति या गोष्टी असतील तरच सहकारी शेती, लहान रस्ते व विहिरी यांची दुरुस्ती, शाळागृहांच्या इमारती, जमिनीची सुधारणा, छोट्या उद्योगधंद्यांची वाढ इत्यादि गोष्टी शक्य होतील. एखाद्या गांवांत पैसा खर्च करून ' मोफत वाचनालय ' काढलें, परंतु त्याचा फायदा घेणारे वाचक नसतील तर या खर्चिलेल्या पैशापासून कांहीं फायदा होणार नाहीं. तशीच गोष्ट ग्रामीण विकासयोजनांच्या कार्यक्रमाची आहे. इतर क्षेत्रांतहि थोड्याफार फरकानें अशीच गोष्ट आहे. तेव्हां योजनेच्या यशासाठीं जनतेचा उत्साह व आपलेपणा जागृत करतां आला पाहिजे. परंतु या बाबतींत अपेक्षेप्रमाणें समाधानकारक परिस्थिति आहे असें म्हणतां येणार नाहीं. जरूरीइतका लोकांचा उत्साह जागृत झालेला दिसत नाहीं ही पंचवार्षिक योजनेच्या यशाच्या मार्गातील एक महत्त्वाची अडचण आहे. कारखानदार लोकहि कांहीं विशिष्ट कारणामुळें स्वतः-च्या उद्योगधंद्यांची वाढ करावयास तयार नाहींत.

### गृहीत धरलेल्या कांहीं अपेक्षा अपूर्ण

पंचवार्षिक योजनेचा कार्यक्रम यशस्वी होण्यासाठीं कांहीं गोष्टी अमुक प्रकारें होतील अशी अपेक्षा करण्यांत आली होती. परंतु त्यांपैकीं कांहीं बाबतींत मूळच्या अपेक्षेप्रमाणें सर्व गोष्टी घडून येतील किंवा नाहीं याबद्दल संशय उत्पन्न झाला आहे. संशय उत्पन्न होण्यासारखें वातावरण विशेषतः चालू सालीं निर्माण झालें आहे. अशा प्रकारच्या घटनांचा येथें थोडक्यांत विचार केला आहे.

योजनेसाठीं सुमारें २५ टक्के पैसा किंवा रु. ५२१ कोटी रक्कम परदेशांकडून मदतीच्या रूपानें मिळूं शकेल असा अंदाज करण्यांत आला होता. गेल्या दोन वर्षांत अंदाजाप्रमाणें रु. १५६ कोटी मिळाले आहेत. परंतु यापुढील काळांत बाकीचे रु. ३६५ कोटी मिळतील किंवा नाहीं याबद्दल थोडासा संशय निर्माण झाला आहे. अमेरिकन सरकारचें गरजू देशांना मदत करण्याच्या बाबतींतलें धोरण बदललें आहे. जागतिक शांतता टिकून राहिल्यास अमेरिकेची मदत निश्चित कमी होणार. आणखी एक गोष्ट म्हणजे खुद्द अमेरिकेंत मंदी येईल कीं काय अशीहि शंका आहे. निदान १९५४ अखेरपर्यंत मंदी उद्भवणार नाहीं असें बहुतेक तज्ज्ञांचें मत आहे. परंतु १९५५ मध्यें मंदी खरोखरच उद्भवली तर इतर देशांवर तिचा परिणाम झाल्याशिवाय राहाणार नाहीं. अशा प्रकारची परिस्थिति असल्यामुळें रु. ३६५ कोटी परराष्ट्रीय मदत १९५६ जूनपर्यंत पूर्णपणें मिळूं शकेल किंवा नाहीं याबद्दल थोडीशी शंका वाटते. त्यांतच ऑक्टोबरच्या सुरवातीला पॅरिसमध्यें सोन्याचा भाव किंचित् उतरला ही गोष्ट भावी








परिस्थितीची सूचक समजली पाहिजे.

पंचवार्षिक योजनेच्या यशासाठीं गृहीत धरलेली दुसरी गोष्ट म्हणजे वस्तूंचे बाजारभाव योजनेच्या काळांत शक्य तितके सामान्यपणें स्थिर राहतील व त्यांत सामान्य जनतेचें जीवन व व्यापार-उद्योगधंदे यांचे हितसंबंध या दृष्टीनें मोठे चढउतार होणार नाहींत ही होय. परंतु या बाबतींत गेल्या २। वर्षांतला अनुभव फारसा समाधानकारक नाहीं असें म्हणावें लागतें. कारण योजनेच्या सुरवातीला म्हणजे जून १९५१ मध्यें सर्व-साधारण वस्तूंच्या किंमतींचा निर्देशांक ४६० होता तो हळूहळू उतरत जाऊन मार्च १९५२ मध्यें ३७० झाला. त्यानंतर विशेषतः जून १९५२ पासून तो ३८० वर जाऊन हळूहळू चढत चढत ऑगस्ट १९५३ मध्यें ४११ पर्यंत पोंचला होता, परंतु सप्टेंबर मध्यें किंचित् उतरून ४०५ वर आला. विशेषतः फेब्रुवारी १९५२ पासूनच्या गेल्या दीड वर्षांत वस्तूंच्या बाजारभावांत फार मोठे फरक झाले. व सामान्य जनतेच्या क्रयशक्तीवर त्याचा अनिष्ट परिणाम झाला. गेल्या सहा महिन्यांतच धान्याच्या किंमतींत १५ टक्के वाढ झाली आहे. फेब्रुवारी - मार्च १९५२ मध्यें निर्माण झालेली तात्पुरती मंदी व त्या नंतर हळूहळू चढत जाणारे बाजारभाव यामुळें व्यापार व उद्योगधंदे यांच्यावर अगदीं अनिष्ट परिणाम झाला आहे. उत्पादन जास्त प्रमाणांत होत आहे परंतु जनतेची क्रयशक्ति कमी झाल्यामुळें माल पडून आहे. मालाला गिऱ्हाईक नाहीं असा अनुभव कापड, साबण, चामड्याचा माल प्लॅस्टिक्सचा माल इ० अनेक प्रकारच्या विक्रीमालाच्या बाबतींत येत आहे. यामुळें व्यापारी व कारखानदार संकटांत आले आहेत. उत्पादनाचा खर्च कारखानदारांना कमी करतां येत नाहीं, कारण कच्च्या मालाच्या किंमती वाढलेल्या आहेत व मजूरवर्गावर करावा लागणारा खर्च कोणत्याहि प्रकारें कमी करतां येत नाहीं. उलट, सहा मोठाल्या उद्योगधंद्यांतील सक्तीचा प्रॉव्हिडंट फंड, व दिल्ली-कानपूर शहरांतून स्टेट इन्शुरन्स स्कीम-ची अम्मलबजावणी – यांमुळें खर्च वाढतच आहे. १९५२-'५३ हें वर्ष व्यापारी व कारखानदार यांना फार वाईट गेलें, व कारखानदारांना आपले कारखाने तात्पुरते बंदहि ठेवावे लागले. हल्लीं ठिकठिकाणीं मालाचे 'सेल्स्' ठेवले जातात, वृत्तपत्रांना पूर्वीप्रमाणें जाहिराती मिळत नाहींत, शिवणकाम करणाऱ्या लोकांना पूर्वीच्या चतु-र्थांश काम मिळतें-इत्यादि गोष्टी सामान्य जनतेची क्रयशक्ति कमी झालेली आहे व व्यापार आणि उद्योग-धंदे यांची परिस्थिति समाधानकारक नाहीं या गोष्टींची निदर्शक आहे. पंचवार्षिक योजनेच्या यशाच्या दृष्टीनें वस्तूंचे बाजारभाव स्थिर राहून व्यापार व उद्योग-धंदे निदान सामान्य रीतीनें चालणें आवश्यक होतें. परंतु या सर्व बाबतींत गेलें दीड वर्ष परिस्थिति असमाधानकारक आहे. आजची ही परिस्थिति विपुलतेमुळें निर्माण झालेली नव्हे, तर हिच्या बुडाशीं सामान्य जनतेची घटलेली क्रयशक्ति ही गोष्ट आहे. १९२९ ते ३९ या काळांतील मंदी ही याहून फार भिन्न होती हें लक्षांत घेतलें पाहिजे. साखर, कापड, गहूं या जीवनोपयोगी वस्तू सामान्य जनता आज पैशाच्या अभावीं खरेदी करूं शकत नाहीं अशी स्थिति आहे. नियोजनमंडळानें आपल्या अहवालांत योजनेच्या यशाला आवश्यक गोष्टी म्हणून निरनिराळ्या वस्तूंचे बाजारभाव, त्यांचें स्थैर्य, नियंत्रणें व वांटप इत्यादि गोष्टींवर फार भर दिला आहे. परंतु या बाबतींत गेल्या दीड वर्षांतील व विशेषतः अगदीं अलीकडच्या सहासात महिन्यांतील स्थिति समाधानकारक नाहीं. साबण, प्लॅस्टिक्स, रबर, हातमाग, यांत्रिक कापड इत्यादि धंद्यांच्या चालकांना आपल्या धंद्यांतील परिस्थितीची सरकारला जाणीव करून देण्यासाठीं परिषदा भरवाव्या लागत आहेत.

वस्तूंचे बाजारभाव समाधानकारक राहिले नाहींत, बाजारभावांचा उत्पादनावर परिणाम होऊं लागला व व्यापार-उद्योगधंदे या बाबतींत कमकुवतपणा निर्माण झाला म्हणजे एकंदर आर्थिक परिस्थिति खालावत जाते व तिचे परिणाम सरकारी करांचें उत्पन्न, पर-राष्ट्रीय व्यापार, भांडवल-संचय आणि भांडवल-गुंतव-णूक या तीन मुख्य गोष्टींवर अनिष्ट होतात. पंचवार्षिक योजनेनें करांचें उत्पन्न, परराष्ट्रीय व्यापार व भांड-वल गुंतवणूक या तीन बाबतींत सामान्यपणें समाधान-कारक परिस्थिति राहील असें गृहीत धरलें होतें. परंतु या तीनहि बाबतींत अपेक्षाभंग झाला आहे. व्यापार व उद्योगधंदे यांची परिस्थिति बिघडली म्हणजे प्राप्ती-वरील कर, उत्पादनावरील जकातींचें उत्पन्न, कस्टमच्या निर्गत जकातींचें उत्पन्न, विक्रीकराचें उत्पन्न हीं सर्व



अनुक्रमणिका








कमी होतात. अर्थात् त्याचा परिणाम सरकारी तिजोरीवर होतो. १९५१ सध्यें कस्टमच्या निर्गत जकाती व प्राप्तीवरील करांचे उत्पन्न चांगलें आलें, परंतु त्यानंतर या करांचें उत्पन्न हळूंहळूं कमी होत आहे व १९५३–५४ मध्यें तें आणखी कमी येईल. पंचवार्षिक योजनेसाठीं मध्य व राज्यसरकारांच्या चालू करांच्या उत्पन्नांतून रु. ५६८ कोटी खर्च करतां येईल असें ठरविण्यांत आलें आहे. परंतु व्यापार-उद्योगधंदे यांच्या बाबतींत निर्माण झालेली चिंतनीय परिस्थिति चालू राहिली तर रु. ५६८ कोटी खर्च चालू करांच्या उत्पन्नांतून करणें कठिण जाईल.

यानंतर परराष्ट्रीय व्यापाराची परिस्थिति. खरेदीदारांची बाजारपेठ निर्माण झाल्यामुळें व जर्मनी आणि जपान यांची स्पर्धा जागतिक बाजारपेठेंत सुरू झाल्यामुळें परराष्ट्रीय व्यापाराची स्थिति आपल्या देशाच्या दृष्टीनें जास्त कमकुवत बनत चालली आहे. १९४६पासून परराष्ट्रीय व्यापार, १९५० चें अवमूल्यनाचें एक वर्ष सोडलें तर, सतत तुटीचा होत आहे. आपल्या व्यापारांत अजूनहि निश्चित सुधारणा झालेली नाहीं. सरकारनेंहि लक्ष या गोष्टींकडे गेलें असून व्यापारमंत्री श्री. डी. पी. करमरकर यांजकडे निर्गत व्यापाराला चालना कशी देतां येईल याबद्दल जरूर तें धोरण आंखण्याचें काम सोंपविण्यांत आलें आहे. हिंदच्या दृष्टीनें परराष्ट्रीय व्यापाराच्या अटी आपणांला जास्त प्रतिकूल बनत चालल्या आहेत. ताग, चहा इत्यादि निर्गतीच्या बाबतींत आपणांला पूर्वीचें, मक्तेगिरीचें स्थान उरलेलें नाहीं. कस्टमच्या जकातींचें उत्पन्न परराष्ट्रीय व्यापारावर, विशेषतः आपल्या निर्गत मालावर अवलंबून असतें. परराष्ट्रीय व्यापाराच्या बाबतींतील ही परिस्थिति पंचवार्षिक योजनेच्या यशाच्या दृष्टीनें कमकुवत बाजू आहे.

पंचवार्षिक योजनेचा एक महत्त्वाचा कार्यक्रम निरनिराळ्या ४१ खाजगी क्षेत्रांतील उद्योगधंद्यांच्या उत्पादनांत नियोजनमंडळानें ठरवून दिल्याप्रमाणें वाढ करणें हा होय. खाजगी रीत्या निरनिराळ्या उद्योगधंद्यांत ही उत्पादन-वाढ शक्य करण्यासाठीं निदान रु. ७०० कोटी भांडवलाच्या रूपानें किंवा इतर तऱ्हेनें गुंतविले गेले पाहिजेत. या बाबतींत नियोजनमंडळानें केलेली अपेक्षा खरी ठरणार नाहीं असें वाटूं लागलें आहे. स्वातंत्र्य मिळण्यापूर्वीं आपल्या देशाच्या उद्योगधंद्यांत खाजगी रीत्या वर्षाला रु. ८० कोटी गुंतविले जात असत. परंतु गेलीं तीन वर्षें वर्षाला रु. ३० कोटी इतक्या कमी प्रमाणांत खाजगी धंद्यांत नवीन भांडवल गुंतविलें जात आहे. भांडवल- गुंतवणुकीचें हें प्रमाण अतिशय असमाधानकारक आहे. सुप्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ कोलिन क्लार्क याच्या विचारसरणीप्रमाणें एखादा धंदा नुसता चालू स्थितींत ठेवण्यासाठीं वर्षाला वार्षिक उत्पन्नाच्या ६ टक्के रक्कम त्या उद्योगधंद्यांत भांडवलाच्या रूपानें गुंतविली गेली पाहिजे. धंद्याची विशेष वाढ करण्यासाठीं भांडवलाची गुंतवणूक वार्षिक उत्पन्नाच्या १५ ते २० टक्के झाली पाहिजे. नियोजनमंडळाच्या अंदाजाप्रमाणें खासगी रीत्या खासगी उद्योगधंद्यांत भांडवलाची गुंतवणूक केली जात नाहीं एवढेंच नव्हे तर भांडवल-संचय व भांडवल-गुंतवणूक या बाबतींत दर वर्षी परिस्थिति जास्त वाईट बनत चालली आहे. ही गोष्ट पंचवार्षिक योजनेच्या यशाच्या दृष्टीनें अतिशय असमाधानकारक आहे. मध्य व राज्यसरकारांच्या करांचें दडपण, मजूरांवरील वाढता खर्च, कच्च्या मालाची महागाई व सरकारी नियंत्रणें यामुळें खाजगी क्षेत्रातील भांडवलदारवर्गाची परिस्थिति समाधानकारक नाहीं. रिझर्व्ह बँकेनें श्री. ए. डी. श्रॉफ यांच्या अध्यक्षेखालीं, खासगी रीत्या भांडवल-संचय व भांडवल-गुंतवणूक अगदीं अपुऱ्या प्रमाणांत कां होते याबद्दल कारणें शोधून काढून कांहीं व्यवहार्य उपाययोजना सुचविण्यासाठीं, एक तज्ज्ञांची कमिटी नेमिली असल्याचें वृत्त ता. ६ ऑक्टोबर रोजीं प्रसिद्ध झालें आहे.

पंचवार्षिक योजनेच्या अंदाजाप्रमाणें ३८५ कोटी रु. लोकांपासून सरकारी कर्जें व लहान बचतयोजना यांच्या द्वारें उभारतां आले पाहिजेत. अजूनपर्यंत या बाबतींत साधारण समाधानकारक परिस्थिति आहे. परंतु जनतेची घटत जाणारी क्रयशक्ति विचारांत घेतली असतां, यापुढील २॥ वर्षांत लहान बचतयोजना व सरकारी कर्ज-उभारणी यांच्या बाबतींत पूर्णपणें यश येईल किंवा नाहीं हें निश्चितपणें सांगता येत नाहीं.

पंचवार्षिक योजनेच्या यशासाठीं वस्तूंचे बाजारभाव स्थिर राहाणें, व्यापार-उद्योगधंदे यांची परिस्थिति समाधानकारक राहाणें, परराष्ट्रीय व्यापार व्यवस्थित चालणें, खासगी रीत्या भांडवल-गुंतवणूक








योग्य प्रमाणांत होणें, सरकारी कर्ज-उभारणी व बचत-योजना यशस्वी होणें इत्यादि गोष्टी गृहीत धरण्यांत आल्या आहेत. परंतु या सर्व बाबतींत अलीकडे कशा प्रकारची परिस्थिति निर्माण झाली आहे याचें विवेचन वर केलेंच आहे. त्यावरून आपल्या यशाच्या मार्गांत कांहीं अडचणी उद्भवल्या आहेत असें दिसून येईल.

या अडचणींत आणखी कांहीं गोष्टी भर घालीत आहेत. यापैकीं महत्त्वाची गोष्ट म्हणजे गेले चारपांच महिने सुशिक्षितांतील बेकारीचा प्रश्न चिंताजनक बनत चालला आहे. नोंदविलेल्या बेकारांचा आंकडा सुमारें पांच लक्ष झाला आहे. नियोजनमंडळानें नुकतीच गेल्या ऑगस्टमध्यें बेकारीवर अकराकलमी उपाययोजना जाहीर केली आहे. परंतु यामुळें सध्यांची बेकारी नष्ट होईल असें दिसत नाहीं. अंदाजाप्रमाणें चालू करांचें उत्पन्न यापुढें हातीं आलें नाहीं किंवा परराष्ट्रांकडून रु. ३६५ कोटींची आणखी मदत पूर्णपणें मिळूं शकली नाहीं, व कर्जउभारणी आणि बचतयोजना यांपासून जरूर तो पैसा उभारतां आला नाहीं, तर रु. ३०० कोटीहून फार मोठ्या प्रमाणांत नोटा छापून खर्च करण्याचा प्रसंग ओढवेल व ही सर्वांत अनिष्ट गोष्ट ठरेल.

शेतमालाच्या किंमती उतरणें शेतकरीवर्गाच्या हिताच्या दृष्टीनें योग्य ठरणार नाहीं. मजूरांचे संप अलीकडे फार कमी प्रमाणांत झाले ही एक समाधानाची गोष्ट आहे. १९५२ मध्यें मजूरांच्या संपामुळें दरमहा २ लक्ष ७८ हजार कामाच्या दिवसांचें (man-days चें) नुकसान झालें, परंतु १९५३च्या पहिल्या पांच महिन्यांत दरमहा सरासरी २ लक्ष ४ हजार कामाच्या दिवसांचें नुकसान झालें. ही एक समाधानाची बाजू आहे.

### भावी आशा

पंचवार्षिक योजनेच्या मार्गांतील मूलभूत आर्थिक अडचणींचा या लेखांत थोडक्यांत उल्लेख केला आहे. या अडचणींचें स्वरूप योजनेच्या कालांत, निदान पहिल्या पंचवार्षिक योजनेच्या काळांत बदलणें संभवनीय नाहीं. योजनेसाठीं सरकारची यंत्रणा कार्यक्षम पाहिजे. या बाबतींत जरूर ती सुधारणा करण्याला अजून अवसर आहे. जनतेचा उत्साह योग्य प्रमाणांत जागृत झाला नाहीं ही अडचण अजूनहि थोडीफार दूर होण्यासारखी आहे. सरकारी यंत्रणा कार्यक्षम व उत्साही असेल तर जनतेचा उत्साह जागृत होण्याला निश्चित मदत होईल. परंतु नियोजनमंडळानें अपेक्षा केल्याप्रमाणें परराष्ट्रीय व्यापार समाधानकारक होत नसेल व परदेशांकडून जरूर ती मदत मिळण्याच्या बाबतींत अडचणी येत असतील तर या गोष्टी पुढील २॥ वर्षांत फारशा बदलतां येणार नाहींत. अंतर्गत आर्थिक परिस्थिति योग्य रीतीनें नियंत्रित केली गेली तर अजूनहि जून १९५६ पर्यंत वस्तूंचे भाव स्थिर राहून व्यापार-उद्योगधंदे याबाबतींत परिस्थिति थोडीशी सुधारेल. कारखानदारांवरील करांचें दडपण कमी करण्यांत आलें तर उद्योगधंद्यांत खासगी रीत्या थोडया जास्त प्रमाणांत भांडवल-गुंतवणूक केली जाणें शक्य आहे. कांहीं झालें तरी नोटा छापून खर्च करण्याचा मार्ग (deficit financing) अवलंबिला जावूं नये. सरकारनें देशांतील श्रीमंत भांडवलदारांकडून कर्जें मिळविण्याचा प्रयत्न करावा. देशांतील कांहीं थोडे लोक इतके श्रीमंत आहेत कीं त्यांचा विश्वास संपादन करतां आल्यास ते सहज योजनेच्या कार्यक्रमासाठीं जरूर ते कर्ज देऊं शकतील. तेव्हां आर्थिक बाबतींत अंदाज बरोबर न ठरल्यामुळें उद्भवलेली परिस्थतीहि थोडीशी योग्य धोरणानें आटोक्यांत आणणें कांहीं प्रमाणांत शक्य होईल. सारांश, योजनेच्या मार्गांतील कांहीं अडचणी निदान थोडया प्रमाणांत तरी सरकारला अजूनहि दूर करतां येतील.

---

## साभार पोहोंच

**स्वतंत्र भारताची पहिली पंचवार्षिक योजना (१९५१ – १९५६)**– लेखक: **श्री. भा. म. काळे** एम्. ए. बी. टी. प्रकाशक: **बापट आणि कंपनी;** मुंबई २. प्रचलित प्रश्न– पुस्तिका क्र. ३. (१९५३) किं. १२ आणे. पानें ८०.



अनुक्रमणिका






प्रा. देवदत्त अ. दाभोलकर

# वर्तमान विफलता : कांहीं विचार

विफलता विविध प्रकारची असूं शकते. कांहीं विफलता सर्वस्वीं व्यक्तिगत कारणामुळें उत्पन्न झालेली असेल. कांहीं विफलतेंत व्यक्तिगत व बाह्य कारणांचें वेगवेगळया प्रमाणांत मिश्रण झालेलें असेल. तर कांहीं विफलता व्यक्तिगत सुस्थिति असतांनाहि बाह्य कारणांच्या उत्कट संवेदनेमुळें निर्माण होत असेल.

व्यक्तिगत विफलतेचें उदाहरण द्यावयाचें झाल्यास असाध्य रोगामुळें किंवा अत्यंत प्रिय व्यक्तीच्या आकस्मिक निधनामुळें निर्माण होणाऱ्या विफलतेचें उदाहरण देतां येईल. दैवाला बोल लावण्यापलीकडे या विफलतेच्या संबंधांत दुसरें कांहीं करणें कोणालाहि शक्य नसतें. परंतु या व्यक्तिगत विफलतेच्या मर्यादा कोठें संपतात व बाह्य कारणांनीं उत्पन्न होणारी विफलता कोठें सुरु होते हें नीटपणें सांगणें अवघड आहे. किंबहुना अशक्य आहे. या बाह्य कारणांमध्यें आर्थिक, राजकीय, सामाजिक अशा अनेक कारणांचा समावेश होऊं शकेल. सुटसुटीतपणासाठीं अशा सर्व बाह्य कारणांनीं निर्माण होणाऱ्या विफलतेला आपण सामूहिक विफलता असें नांव देऊं.

असाध्य रोग किंवा प्रिय व्यक्तीचें निधन ही विशुद्ध व्यक्तिगत विफलतेचीं आत्यन्तिक उदाहरणें जरी घेतलीं तरी त्यांतहि सामूहिक विफलतेचा अंश अनेकदां आढळून येईल. रोगावर करावयाचे उपचार, प्रिय व्यक्तीच्या निधनाचीं कारणें या संदर्भात सामूहिक विफलतेचा संबंध येत असेल. आर्थिक विषमतेमुळें उपचारासाठी पुरेसा पैसा जवळ नसेल. शुश्रूषागृहा-(हॉस्पिटल)मध्यें भिन्नवर्गीयांना विषम वागणूक मिळत असेल, किंवा राजकीय आघातामुळें किंवा घातामुळेंहि असाध्य रोग किंवा प्रिय व्यक्तीचें निधन हीं माणसाच्या नशिबीं आलेलीं असतील. यांपैकीं राजकीय आघात व घात यामुळें निर्माण होणारीं दुःखें हुकुमशाहीच्या उदयानंतर हुकुमशाही राष्ट्रांतील जनतेला फारच मोठ्या प्रमाणांत सोसावीं लागलीं. फाळणीनंतर आपल्या राष्ट्रांत झालेल्या अत्याचारांतहि ह्या दुःखांनीं आकस्मिक झंझावाताप्रमाणें अनेक जीवनें उध्वस्त करून टाकलीं. आर्थिक बेकारींतहि व्यक्तिगत व सामूहिक कारणांची अशीच सरमिसळ झालेली आपल्याला आढळून येईल. सर्व विफलता ही व्यक्तिगत विफलता मानून, निमूटपणें 'ठेविलें अनन्तें तैसेंचि रहावें' या वृत्तीनें दिवस कंठण्याची वृत्तीच जनतेंत अधिक असते. व्यक्तिगत विफलतेंतील सामूहिक विफलतेचा भाग जनतेला जसजसा अधिक स्पष्टपणें जाणवूं लागतो, तसतशी जनता अधिकाधिक जागृत व क्रान्तिप्रवण होऊं लागते.

या क्रान्तिप्रवणतेंतूनच वेगवेगळया संघटना जन्मास येतात. व्यक्तिगत विफलता पहिली कात टाकून नवीन स्वरूपांत एका नवीन कार्यक्षेत्रांत प्रवेश करते. या कार्यमग्नतेंत कांहीं काळ या विफलतेला साफल्याचाहि आभास होतो. ती एक प्रकारची नशाच असते. या कार्यमग्नतेंसून खरी सफलता साध्य होण्यास सामूहिक विफलतेचें अचूक निदान, साध्यसाधनांचा युक्त विचार आणि परिस्थितीची अनुकूलता या गोष्टींची आवश्यकता असते. यांपैकीं कोणतीहि गोष्ट अपुरी पडली तरी संघटनाक्षेत्रांतहि अखेर विफलताच पदरीं पडते. जागतिक लोकशाही आघाडी, रशियन साम्यवाद अशा जागतिक संघटनांतून, किंवा भारतीय स्वातंत्र्यवादी कॉंग्रेस किंवा राष्ट्रीय स्वयंसेवकसंघ अशा विशिष्ट भूभागांत व क्षेत्रांत काम करणाऱ्या संघटनांतून आढळून येणारी विफलता अशा अपुरेपणांतूनच जन्माला येते. वरील त्रिविध कारणांचा विचार केवळ विशिष्ट काळाशीं संलग्न, स्थितिशील असा (static) करावयाचा नसून प्रगमनशील कालसापेक्ष (dynamic) असा करावयाचा असतो हें लक्षांत ठेवलें कीं या तीन अटी सांभाळणें किती दुर्घट आहे याची जाणीव होईल. या विफलतेशी झुंज घेत, निष्कामबुद्धि हौतात्म्यवृत्तीनें कार्यरत ठेविणें एवढी एकच गोष्ट या विफलतेवर








व्यक्तिगत उतारा म्हणून उपयोगी पडते.

परंतु हुतात्मा होण्यासाठीं एक तर आडमुठा मूर्खपणा अंगीं असावा लागतो किंवा कोणतीतरी एक परा कोटीची श्रद्धा असावी लागते. (परा कोटीची श्रद्धा हाहि आडमुठ्या मूर्खपणाचाच एक प्रकार आहे असेंहि कदाचित् कोणास वाटेल ). आडमुठा मूर्खपणा कांहींजणांच्याच अंगीं असतो, परंतु सरसहा जनतेच्या ठिकाणीं तो संभवत नाहीं, हीहि एक समाधानाचीच गोष्ट आहे. त्यामुळें सफलतेचें समाधानी वातावरण हवें असल्यास एक तर त्या काळांत कोणतेच महत्त्वाचे वादग्रस्त प्रश्न नसावे लागतात, किंवा कोणत्यातरी एका दृढ श्रद्धेनें तरी वातावरण भारलेलें असावें लागतें. ईश्वरावरची अन्तिम श्रद्धा ही देखील जिवाला खराखोटा दिलासा देण्यासाठीं उपयोगी पडूं शकेल. पहिल्या महायुद्धापूर्वींच्या काळांत सामूहिक विफलता जाणवत नव्हती. त्याचीं कारणेंहि कांहींशी अशींच आहेत. पुढें प्रकट झालेले संघर्ष त्या काळांतहि आंतून शिजत येतच होते. परंतु स्फोटक उद्रेकाच्या सीमेवर ते अजून येऊन ठेपले नव्हते. या संघर्षाची जाणीव ज्यांना होती त्यांना त्या संघर्षावर मार्क्सवादानें सुचविलेल्या उपायाविषयीं पूर्ण आशा होती. हा काळहि पाश्चात्त्य राष्ट्रांच्या दृष्टीनें भरभराटीचा होता. धर्माचें श्रद्धा-स्थानहि सर्वसाधारण जनतेच्या मनांतून ढळलें नव्हतें. अप्रगत राष्ट्रांतील जनता पीडित, दलित अशी होती. परंतु नुकत्याच येऊं लागलेल्या राजकीय स्वातंत्र्याच्या आकांक्षेखेरीज दुसरी कोणतीच जाणीव या जनतेच्या मनांत नव्हती. मति कुंठित करणाऱ्या कोणत्याहि विशेष प्रश्नाचा अभाव हेंच या काळांतील तकलादू सफलतेचें कारण म्हणून सांगता येईल.

पहिल्या महायुद्धानंतर ही सर्वच परिस्थिति पालटली. ज्या प्रश्नांचे स्फोटक उद्रेक व्हावयाचे राहिले होते ते झाले. जे आजवर आंतल्या आंत शिजत राहिले होते ते उतूं जाऊं लागले. जी उपाययोजना विचारवंतांना व कृतिवीरांना पुरेशी होईल असें वाटलें होतें तिचा अपुरेपणा दिवसानुदिवस अधिकाधिक प्रतीत होऊं लागला. साम्यवाद आला परंतु लोकशाही दुरावली. भांडवलशाही राष्ट्रांतहि हुकुमशहा उघडपणें लोकशाही पायतळीं तुडवूं लागले; इतकेंच नव्हे तर या पायमल्लीला तात्त्विक अधिष्ठानहि देऊं लागले! जागतिक आर्थिक मंदीनें आर्थिक सुरक्षिततेचा नाश केला व सार्वजनिक असुरक्षितता, अस्थिरता यांची जाणीव प्रतिक्षणीं होऊं लागली. वैफल्याच्या वेदनेंतूनच स्टीफन् झ्वाईग, अर्न्स्ट टोलर यांसारख्या संवेदनाशील लेखकांनीं आपल्या जीवनाचा अन्त करून घेतला. 'शतका-शतकांच्या भविष्यकालाचा विचार केला तरच आत्मघातापासून मनाला परावृत्त करतां येईल' ('One must think in terms of centuries, otherwise one might commit suicide') असें म्हणणाऱ्या टोलरलाहि स्पेनमधील यादवी युद्धांत हुकुमशाहीचा जय झाल्यानंतर अधिक धीर धरवला नाहीं.

भारतांत ही वैफल्याची जाणीव अलीकडेच उत्कटतेनें होऊं लागलेली आहे. राजकीय स्वातंत्र्याचा संग्राम चालू होता तोंपर्यंत एका निश्चित ध्येयनिष्ठेचें तेज वातावरणाला भारून राहिलें होतें. राजकीय स्वातंत्र्य आलें आणि त्याच्या अपुरेपणाची जाणीव होतांच आनुषंगिक विफलता आली. विफलतेचा उद्‌भव असहायतेच्या भावनेंत असतो. कर्तृत्वाचें आव्हान जोंपर्यंत असतें तोंपर्यंत विफलतेला अवसरच नसतो. Bliss was it in that dawn to be alive but to be young was very heaven, असें ज्या काळाचें वर्णन करतां यावें अशा स्वातंत्र्य काळाच्या उपःकालींच उत्साहाला विफलतेचें ग्रहण कां लागावें? याचें एक कारण असें कीं ज्या जागतिक पार्श्वभूमीवर भारतांतील पुनर्रचनेचें भवितव्य अवलंबून आहे त्या जागतिक परिस्थितीविषयींच शंकाकुलता निर्माण झाली आहे. साम्यवाद व भांडवलशाही लोकशाही यांच्यांतील अटळ संघर्ष, जागतिक युद्धाची संभाव्यता, युद्धाची सर्वसंहारकता यांमुळें नवीन उभारणीसाठीं जो विश्वास वाटावा तो वाटत नाहीं. सागरावर वादळाचीं चिन्हें दिसत असतांना तीरावर वाळूचे इमले उभारण्याच्या प्रयत्नासारखें तें निष्फळ वाटतें. पुनर्रचनेचें कार्य जर गतिमान् (dynamic) वृत्तीनें पूर्ण झालें तरच लोकशाही वांचूं शकेल. परंतु आवश्यक ती गतिमान् वृत्ति आपल्याला साध्य होऊं शकेल असाहि आंतरिक विश्वास वाटत नाहीं. क्रान्तिकारक कृतिशीलतेची नवी पिढी '४२ नंतर आजवर भारतांत पुढें येऊं शकली नाहीं हा विचार करण्यासारखा प्रश्न








आहे. या वैफल्याच्या वातावरणांतच या नवीन पिढीचा जन्म कुंठित आहे. एखादा जयप्रकाश किंवा विनोबा डोळसपणें या वैफल्याच्या लाटेला अडवून धरण्याचा प्रयत्न करीत असतांना दिसतो. या प्रयत्नाच्या सफलतेविषयीं आजच कुणीं काय सांगावें ?

समाजमनांतील ही विफलता ज्यांना उत्कटपणें जाणवावी व ज्यांच्या कृतींतून ही वैफल्याची वेदना प्रकट व्हावी त्या भारतीय कलावन्तांनीं मात्र भारताची निराशाच केली आहे. यन्त्रयुगांत यन्त्राच्या चाकांत भरडला जाणारा माणूस, राजकीय संघर्षांत आपल्या पाशवी मूळ स्वरूपांत प्रकट होणारा आदिमानव, समाजबंधनांत नियतीच्या जाळ्यांत सांपडलेल्या मासळीप्रमाणें तडफडणारी मानवता – यांचा पारदर्शी वेध घेऊन त्यांचें यथार्थ चित्रण करणारे, त्या वेदनेनें विव्हल होणारे कलावंत आढळत नाहींत. वाङ्मयादि कलांतून आढळतात ते या वैफल्याचे दूरान्वित प्रतिसाद ! समाजाच्या एका विशिष्ट बुद्धिजीवी (?), कृतिशून्य विफलमनोरथ मध्यमवर्गीय मनांत या विश्वव्यापी विफलतेचें उमटणारें एक तोटकें एकांगी प्रतिबिंब ! याच वर्गांतील रसिक या अपुऱ्या चित्रणांतूनच पुनःप्रत्ययाच्या मिळणाऱ्या समाधानावर संतुष्ट असतो. एखाद्या भूकंपाचा हादरा एका लहानशा डबक्याला बसावा आणि त्यांतील जीवजन्तूंनीं आपल्या अनुभूतींचें निवेदन-निरूपण करावें तशांतलीच आजची आपल्या मध्यवर्गीय संकुचित दृष्टीच्या कलाकारांची व रसिकांची स्थिति आहे. कदाचित् सर्वसामान्य मानवाच्या प्रतिभेच्या आवांका असावा. हाच यापलीकडची सर्वस्पर्शी झेंप घेणारा एखादा विचारवन्त किंवा कलावंत ही निसर्गाची शतकांशतकांतून क्वचितच मिळणारी एक देणगी आहे.

---

## एक स्मृतिशेष साम्राज्य !

[ विजयनगरच्या साम्राज्याचे उद्‌ध्वस्त अवशेष पाहून मनावर झालेली प्रतिक्रिया वर्णन करण्याचा येथें प्रयत्न केला आहे. ]

एकदां नांदली जेथें रम्य नगरी
त्या तिथें उगवलीं झुडुपें किति कांटेरी !
या दगडांनाहि फुटतो कढ दुःखाचा
कण्हतात कहाण्या केविलवाण्या वाचा

या इथें विलसलें पाउल श्रीरामाचें
पाण्यांत मिसळलें दिव्य अर्घ्य ऋषींचें
येथेंच भेटली अयोध्येस किष्किंधा
येथुनीच सुटलें आव्हान रावणा युद्धां

येथेंच तपस्या वेंची विद्यारण्य
फलभार वेउनी सामोरें ये पुण्य
ज्या गुहेंत घुमला ध्वनि वेदमंत्रांचा
दिसतात आजला तिथें शिळांच्या खांचा !

सुखशेज सजविली प्रमदूरांनीं जेथें
त्या स्थळीं विलासीं, भग्न कलशलें जोतें
मातींत मिसळले सुगंध-शोणित ओघ
ते हिरे जाहले गारगोटिचे ढीग

कट, कारस्थानें, जल्लोष, घोष, हैदोस
वाऱ्यावर विरला गर्वोद्धत आवेश

ही छिन्न जाहली मुंडावळ देवांची
सांगते पुराणें दुबळयांच्या कर्मांचीं

हें कालक्रीडित, कसलें भीषण द्यूत !
पट उधळी निमिषीं अज्ञाताचा हात
विखुरले चहुंकडे विभवाचे सांगाडे
हा विनाश भ्रमवी घाली मतिला कोडें !

कुणि शोधी चुकल्या इतिहासाचीं पानें
कुणि दावी, मिरवी भूतकाळ अभिमानें
कुणि अश्रु ढाळितो दाटुनिया हृदिं खंत
तीर्थांत बुडुनि कुणि व्हावें म्हणतो मुक्त

कुणि मुशाफिरीला मानी योग्य ठिकाण
कुणि पोटासाठीं थाटी येथ दुकान !
आकाश निरामय, तटस्थ डोंगरखोरीं
चढउतार बघती सारे प्रलयंकारी

सांठवून उदरीं सुखदुःखांच्या राशी
ही नदी धांवते पुढें पुढें प्रतिदिवशीं
स्मृतिशेष जाहल्या साम्राज्याची गाथा
आळवीत बसलों येथ एकला नुसता !

—गो. म. कुलकर्णी










श्री. मा. प. मंगुडकर

# कायदेमंडळाचे अध्यक्ष आणि पक्ष-राजकारण

हिंदुस्थानच्या कायदेमंडळांतील सभाप्रमुखाचें (Speaker चें) कार्य कोणतें आणि स्थान काय याचा विचार होणें दोन दृष्टींनीं आवश्यक आहे. एक तर विधिमंडळाधीन लोकशाही यशस्वी करण्यासाठीं निःपक्षपाती न्यायालयें आणि कायदेमंडळाशीं एकनिष्ठ असलेली नोकरशाही यांची जितकी गरज आहे तितकीच पक्षातीत सभाप्रमुखाची आवश्यकता आहे. कायदेमंडळांतील सभाप्रमुखाचें कार्य फक्त कामकाजा-(Procedure) पुरतेंच मर्यादित नसून एकंदर कायदेमंडळांतील जीवनपद्धतींतच त्याचें स्थान फार महत्त्वाचें आहे. कायदेमंडळांत अल्पमतवाल्यांचे विचार व्यक्त होऊं न देणें किंवा बहुमतवाल्यांचें विरोधकांवर अन्याय्य आक्रमण चालूं देणें हें पुष्कळ वेळां सभाप्रमुखावर अवलंबून असतें. सभाप्रमुखाला आपलें वर्तन घटनेंतील कलमाशीं सुसंगत ठेवणें जरूर असतें. परंतु सर्वच तपशील घटनेंत येऊं शकत नाहीं. तेथें सभाप्रमुखाला भरपूर वाव असतो. या दृष्टीनें सभाप्रमुखाच्या कार्याला लोकशाहीच्या प्रयोगांत महत्त्वाचें स्थान आहे. आणि दुसरें असें कीं आजची हिंदुस्थानांतील लोकशाही बाल्यावस्थेंत आहे. आज आपण जे नवे संकेत, नवे प्रघात किंवा नव्या परंपरा निर्माण करूं त्याच उद्यां चिरस्थायी होतील. लोकशाही-प्रधान राज्यांत लिखित घटना जेवढी महत्त्वाची असते तेवढीच संकेत, प्रघात आणि परंपरा यांनीं निर्माण होणारी अलिखित घटना देखील श्रेष्ठ असते. या दृष्टीनें आपल्या लिखित घटनेचें कार्य संपलेलें असलें तरी अलिखित घटनेचें कार्य नुकतेंच सुरूं झालें आहे. या काळांत लोकशाहीला पोषक असे पायंडे निर्माण करण्याबाबत आपण अत्यंत दक्ष असणें जरूर आहे. नव्यानें निर्माण होत असलेल्या प्रथेमध्यें सभाप्रमुखाच्या जागेला मानाचें स्थान दिलें पाहिजे. नव्या परंपरा आणि कायदेमंडळांतील सभाप्रमुखाचें स्थान या दोन्ही दृष्टींनीं आपल्याकडील सभाप्रमुखाच्या कार्याचा सूक्ष्म अभ्यास होणें जरूर आहे.

### श्री. मावळंकर यांचें मत

पंधरा मे एकोणिसशें बावनला दिल्ली लोकसभेच्या सभाप्रमुखाची निवडणुक झाली. श्री. मावळंकर हे लोकसभेचे सभाप्रमुख म्हणून निवडून आले. त्या प्रसंगीं त्यांनीं आपल्या भाषणांत सभाप्रमुखाच्या भूमिकेसंबंधीं कांहीं विचार व्यक्त केले ते मननीय आणि अभ्यसनीय आहेत. ते म्हणतात: " हिंदुस्थानच्या कायदेमंडळांतील सभाप्रमुखानें इंग्लंडच्या सभाप्रमुखाचें अनुकरण करण्याचें कारण नाहीं. कारण त्यांची ऐतिहासिक उत्क्रान्ति निराळ्या तऱ्हेनें झाली आहे. आपल्याला आपली पार्श्वभूमि संस्कृति, इतिहास यांचा विचार करून नवी परंपरा निर्माण केली पाहिजे. आपल्याकडील सभासदानें सभाप्रमुख झाल्याबरोबर राजकीय पक्षाशीं सर्व संबंध तोडून टाकण्याचें कांहीं कारण नाहीं. तो सभाप्रमुख होऊनसुद्धां राजकीय पक्षाचा सदस्य राहूं शकतो. मी सभाप्रमुख असूनसुद्धां कॉंग्रेसचें सदस्यत्व सोडूं शकत नाहीं. मात्र मी निःपक्षपातीपणानें कायदेमंडळाचें कामकाज केलें पाहिजे"[1].

श्री. मावळंकर यांनीं (जानेवारी १९५३) 'एशिअन रिव्ह्यू' मधील आपल्या लेखांत वरील विचार विस्तारानें मांडला आहे. त्यांच्या मतें कायदेमंडळाच्या सभाप्रमुखाला राजकीय पक्षापासून सर्वस्वीं अलिप्त राहणें शक्य नाहीं,

1 " The position of the English Speaker was a matter of historical growth and had been established after centuries of evolution ... While the Indian Speaker should be a non-party man, meaning thereby that he should keep aloof from party deliberations and decisions, he did not cease to be a politician merely because he was a Speaker... I, therefore, continue to be a Congressman just as any Indian can continue to be a Hindu, Muslim or Parsee and while doing so, he is no less than an Indian so far as notinal questions are concerned." 'The Times of India'— 16th May 1952.

आणि शक्य असलें तरी तें इष्ट नाहीं. शक्य नाहीं अशासाठीं कीं आजच्या बहुतेक सभाप्रमुखांनीं आपली हयात राजकीय पक्षांमध्यें घालविली आहे; पक्षाशीं त्यांचें जीवन इतकें एकरूप झालें आहे कीं त्यांना त्यांपासून सर्वस्वीं दूर होतां येणार नाहीं. आणि इष्ट नाहीं अशाकरतां कीं अशा सभाप्रमुखावांचून या देशांत लोकशाही दृढमूल होणार नाहीं. लोकशाहीच्या संरक्षणासाठीं आणि संवर्धनासाठीं अशा राष्ट्रीय चळवळींत आयुष्य वेंचलेल्या सभाप्रमुखांचीच गरज आहे.[२]

## स्वातंत्र्यपूर्व विचार

श्री. मावळंकर यांच्या वरील विधानांचा विचार आजच्या बदललेल्या राजकीय परिस्थितीच्या पार्श्वभूमीवर होणें जरूर आहे. इ. स. १९४७ पूर्वी ब्रिटिशांची सत्ता आपल्यावर होती. राजकीय स्वातंत्र्य हेंच त्या वेळीं आपल्या सर्व चळवळींचें साध्य होतें. याचीं प्रतिबिंबें आमच्या सर्व हालचालींत व्यक्त होत होतीं. इ. स. १९३७ आणि इ. स. १९४५ या सालीं कॉंग्रेसनें निवडणुका लढविल्या तेव्हां प्रांतांत तिचींच मंत्रिमंडळें झालीं होतीं. या काळांत कॉंग्रेसचे नामवंत पुढारी हेच कायदेमंडाळाचे सभाप्रमुख म्हणून काम करीत होते. ते सभाप्रमुख झाले होते तरी देखील राजकीय पक्षाचे क्रियाशील सभासद म्हणून सर्व राजकीय चळवळींत भाग घेत होते. इतकेंच नव्हे, तर त्यांच्या या भूमिकेचें जाहीर समर्थनहि करण्यांत येत असें. इ. स. १९३८ सालीं सभाप्रमुखाच्या राजकीय चळवळीसंबंधींची चर्चा संयुक्त प्रांताच्या विधानमंडळांत झाली होती. श्री. पुरुषोत्तमदास टंडन त्यावेळीं तेथील सभाप्रमुख होते. त्यांनीं त्यां वेळीं सभाप्रमुखाच्या पक्षाच्या क्रियाशील सभासदत्वाचें समर्थन केलें. त्यांच्या मतें, सभाप्रमुखाच्या जागेसाठीं पक्षनेत्याची निवड करायची नसली तर तिसऱ्या प्रतीच्या माणसाची प्रस्थापना त्या जागेवर करावी लागेल व लायक माणसांच्या कर्तृत्वाला देशाला मुकणें भाग पडेल. पंडित जवाहरलाल नेहरु त्यावेळीं कॉंग्रेसचे अध्यक्ष होते. त्यांनीं टंडनच्या वरील मतास दुजोरा दिला आणि सांगितलें कीं परतंत्र राज्यांतील सर्वत्र लोकांना एकच ध्येय श्रेष्ठ वाटत असतें. तें म्हणजे स्वराज्यप्राप्ति. त्यासाठीं त्यांच्या सर्व हालचाली चालूं असतात. सभाप्रमुख देखील या नियमाला अपवाद असूं शकत नाहीं.[३]

परंतु इ. स. १९३८ मधील एका विधानसभेच्या सभाप्रमुखाचे किंवा कॉंग्रेसच्या अध्यक्षाचे हे विचार आज आपणास मार्गदर्शक ठरूं शकत नाहींत. दुर्दैवानें सभाप्रमुखाच्या भूमिकेसंबंधीं नव्या परंपरा निर्माण करण्यासाठीं आपणास भूतकालाकडे पाहतां येत नाहीं. कारण यापूर्वीच्या काळांत यासंबंधीं निकोप, निरामय परंपरा या देशांत निर्माण होऊं शकल्या नाहींत. इ. स. १९१९ च्या कायद्यानें हिंदुस्थानांत प्रांतीय आणि मध्यवर्ती सरकारांत लोकमंत्र्यांना कांहीं सोंपीव खातीं मिळालीं. इ. स. १९१९ पासून १९३६ पर्यंत हिंदुस्थानांत सर्वत्र कायदेमंडळांत सभाप्रमुख आपापलें काम करीत होते. परंतु या काळांत परंपरा निर्माण होऊं शकली नाहीं. असलेलीं उदाहरणें उलटसुलट दोन्हींहि प्रकारचीं आहेत. उदा०, १९२५ सालीं विठ्ठलभाई पटेल हे इ. स. १९१९ च्या कायद्याप्रमाणें प्रथम मध्यवर्ती कायदेमंडळाचे हिंदी सभाप्रमुख झाले. त्या प्रसंगीं त्यांनीं खुलासा केला होता कीं आजपासून मी कोणत्याहि पक्षाचा सभासद नाहीं. सभाप्रमुखाला राजकीय पक्ष नसतात. तो निःपक्षपाती आणि पक्षातीत असावा लागतो. श्री. विठ्ठलभाई पटेल यांनीं प्रसंगीं ब्रिटिश सरकारविरुद्ध निर्णय देऊन आपला न्यायनिष्ठुरपणा आणि पक्षातीत धोरण सिद्ध केलें होतें. परंतु त्या वेळींच प्रांतांत याच्या उलट उदाहरणें पहावयास सांपडतात. मुंबई प्रांताचे सभाप्रमुख म्हणून जे सतत नऊ वर्षें काम करीत होते ते १ एप्रिल १९३५ सालीं स्थानिकस्वराज्यखात्याचे

2 "Many of the Speakers have been active politicians and have participated in the struggle for independence. They represent an important section of the active members of their party. They are connected with a number of nation-building activities and it will not be possible for the Speakers to withdraw themselves entirely from all political life, especially in view of the necessity of personnel as also the consolidation of democracy." — 'Asian Review' — Volume XI, January 1953, Pages 6-7.

3 "I see no reason why he should not participate in political activities outside the legislature. This becomes all the more important in a country situated as India is at present, that is, a country under alien domination struggling to be free".








मंत्री होण्यासाठीं राजिनामा देतात आणि पक्षाचे अध्वर्यू बनतात. अशा गोष्टी इतिहासांत नमूद झाल्या आहेत. सभाप्रमुखाच्या खुर्चीवरून उठून मंत्र्याच्या खुर्चीवर बसणें व मंत्र्याच्या खुर्चीवरून उठून सभाप्रमुखाच्या खुर्चीवर बसणें या गोष्टी इतर प्रांतांत देखील कोणाला अनुचित वाटल्या नाहींत. इ. स. १९१९ पासून इ. स. १९३७ पर्यंतच्या काळांत अशीं परस्पर उलटसुलट उदाहरणें असल्यामुळें या कालखंडांतून कांहींच निश्चित बोध घेतां येत नाहीं. इ. स. १९३७ ते १९४७ पर्यंत स्वातंत्र्याच्या झगड्यामुळें सर्व सभाप्रमुखांनीं उघड उघड राजकीय पक्षाशीं संबंध ठेवले होते. राजकीय दास्याचा काल आतां इतिहासजमा झाला आहे. त्यामुळें या दुसऱ्या कालखंडांतूनहि आपण भविष्यकाळासाठीं कांहीं शिकूं शकत नाहीं. लोकशाहीच्या उज्ज्वल भवितव्यासाठीं आपणास आपल्या परिस्थितीप्रमाणें इतर लोकशाहीप्रधान राज्यांतील परंपरांचा देखील अभ्यास केला पाहिजे.

विधिमंडळाधीन लोकशाही नांदत असलेली आजचीं दोन प्रमुख राज्यें म्हणजे अमेरिका आणि इंग्लंड हीं होत. या दोन देशांमध्यें सभाप्रमुखाबद्दल अगदीं परस्परविरोधी संकेत आणि कायदे आपणांस दिसून येतात.

## अमेरिकेंतील सभाप्रमुख

अमेरिकेतील सभाप्रमुख हा कायदेमंडळांत पक्षातीत असल्याचें कधींहि भासवीत नाहीं. त्याला त्याची गरजहि वाटत नाहीं. तो कायदेमंडळाबाहेर जसा पक्षनेता असतो तसाच तो कायदेमंडळामध्यें देखील पक्षाचा पुढारी म्हणून काम करतो. याबाबत निःपक्षपातीपणा हा सद्गुण आहे हें देखील त्यांना मान्य नाहीं. इ. स. १९११ पूर्वी तर तो कायदेमंडळांतील बहुमतवाल्या पक्षाचा एक सुलतानच होता. विरोधकांची तो वाटेल तशी मुस्कटदाबी करीत असे. त्यानंतर त्याच्या धोरणांतील कडवेपणा कमी झाला असला तरी तो पक्षातीत राहण्याचें मान्य करीत नाहीं.[४]

अमेरिकन कायदेमंडाळाचे सभाप्रमुख पक्षातीतपणा हा सद्गुण मानीत नाहींत. याचें प्रमुख कारण म्हणजे त्या देशांत कायदेमंडळें आणि कार्यकारी ( executive ) मंडळें यांच्यांत झालेली फारकत. अमेरिकन अध्यक्ष हे जसे कार्यकारी मंडळाचे प्रमुख असतात त्याचप्रमाणे सभाप्रमुख हे कायदेमंडाळाचे नेते मानले जातात. अमेरिकन सभाप्रमुखाच्या पक्षनिष्ठ धोरणाचें कारण या दोन्ही खात्यांच्या फारकतींत सांपडते. याशिवाय त्याला इतर कारणेंहि असणें संभवनीय आहे.

## इंग्लंडमधील सभाप्रमुख

अमेरिकन सभाप्रमुखाच्या अगदीं उलटें टोंक म्हणजे इंग्लंडचे सभाप्रमुख होत ! वास्तविक अमेरिकन लोक हे इंग्लंडमधून तिकडे जाऊन स्थाईक झालेले. असें असून देखील त्यांच्यांत असलेला फरक पाहून मौज वाटते आणि आश्चर्यहि वाटतें. इंग्लंडचा सभाप्रमुख हा आपल्या खुर्चीवर आरूढ झाला म्हणजे त्याचे त्याच्या पक्षाशीं सर्व संबंध तुटतात. तो पक्षाच्या सभांना हजर राहत नाहीं, त्यांना राजकीय विषयावर सल्ला देत नाहीं. इतकेंच नव्हे तर त्यांच्या मंडळाशीं इतरहि संबंध ठेवीत नाहीं.[५]

इंग्लंडच्या कायदेमंडळाच्या सभाप्रमुखाचें हें निःपक्षपाती आणि पक्षातीत धोरण लोकशाहीच्या वाढीसाठीं आवश्यक आहे. कारण त्याच्या या पद्धतीमुळें विरोधकांमध्यें तो आपल्या निर्णयदानासंबंधीं विश्वास निर्माण करूं शकतो. सभाप्रमुखाच्या न्यायप्रियतेसंबंधीं विरोधकांच्या मनामध्यें शंकेची अंधुक छाया देखील पडतां कामा नये. नाहींतर, कोणताहि पास झालेला कायदा केवळ पक्षपाती पक्षानें, जुलमानें तो इतरांवर लादला

4 "In U. S. A. the Speaker is not impartial and is not intended to be by the majority; nor, if we judge by experience, does he intend to be, although he is expected to be fair to the minority. He is today one of the majority party. Before 1911 he was the party-leader in the legislative branch of government." ... "When the Speaker is chosen, he does not cut off connections with his party. On the contrary, they are even more sedulously cultivated" — 'The Theory and Practice of Modern Government' — Dr. Herman Finer — Vol II, Pp. 783-784

5 "Outside, no less than inside of the House, the (English) Speaker abstains from every appearance of partisanship. He never publicly discusses or voices an opinion on party issues. He never attends a party meeting. He has no connections with party newspapers. He never sets foot in a political club. He, of course, makes no campaign for his own re-election." — Frederic Ogg 'European Governments and Politics' — (Page 245)








आहे अशी भावना निर्माण होईल. लोकशाही राज्यांत ही भावना घातक आहे. या दृष्टीनें इंग्लंडनें या बाबत निर्माण केलेली परंपरा आणि घालून दिलेलें उदाहरण अत्यंत अनुकरणीय आणि प्रशंसनीय आहे.

हिंदुस्थानच्या कायदेमंडळाचे सभाप्रमुख वरील दोहोंपैकीं कोणतें उदाहरण दृष्टीसमोर ठेवणार असा प्रश्न आहे. आज ते निःपक्षपाती राहण्याची कोशीस करतात परंतु पक्षातीत राहणें त्यांना अमान्य आहे. हें त्यांचें धोरण लोकशाहीला कितपत पोषक ठरेल हा खरा प्रश्न आहे.

**नवीन परंपरा घालण्याची जरूरी**

सभाप्रमुखानें आपल्या खुर्चीवर आरूढ झाल्यानंतर पक्षाचे सर्व संबंध तोडणें जरूर आहे. न्यायनिष्ठुरता सर्वच प्रांतांत सर्व सभाप्रमुखांना सारखी जमेल असें म्हणतां येणार नाहीं म्हणून हा शंकास्पद आणि अविश्वसनीय मार्ग टाकून त्यानें पक्षाशीं सर्व संबंध तोडून टाकणेंच अत्यंत श्रेयस्कर !

या विचारावर मुख्यतः दोन आक्षेप घेतले जातात. एक तर असा सभाप्रमुख निवडून येतांना आपल्या मतदारसंघांतून विशिष्ट पक्षाच्या तिकिटावर निवडून येतो. मतदारांनीं त्याला मतें देतांना त्याच्या पक्षाचा विचार केलेला असतो. निवडून गेल्यानंतर व सभाप्रमुख झाल्यानंतर त्यानें पूर्वीच्या पक्षाशीं संबंध तोडून टाकणें म्हणजे पर्यायानें त्या मतदारसंघांतील मतदारांशीं द्रोह करणें आहे. अशी फसवणूक करण्याचा अधिकार कोणालाहि नाहीं.– या आक्षेपांत सत्यापेक्षां सत्याभास जास्त आहे. कारण त्याच्या पक्षातीत धोरणामुळें जर त्याच्या मतदाराची फसवणूक होत असेल तर त्याच्या पक्षनिष्ठ धोरणामुळें एकूण लोकशाहीशींच द्रोह होण्याचा संभव असतो. आणि तो पर्यायीनें त्या मतदारांशीं देखील द्रोह असतो. त्यामुळें लोकशाहीच्या निष्ठेसाठीं सभाप्रमुखानें पक्षातीत राहणें अधिक हितावह ठरेल.

दुसरा आक्षेप असा कीं सभाप्रमुखानें आपल्या राजकीय पक्षाशीं कायदेशीर रीत्या सर्व संबंध तोडले तरी मानसिक निष्ठा तो कशी नष्ट करणार ? ती या औपचारिक देखाव्यानंतर देखील कायम राहणारच ! या आक्षेपांत सत्यांश आहे, हें कबूल केलें पाहिजे. तरी देखील मानसिक निष्ठा एखाद्या पक्षाकडे असणें आणि त्याला त्या पक्षाचा सभासद म्हणून मान्यता देणें यांत फरक केलाच पाहिजे. मूळची निष्ठा एखाद्या पक्षाकडे असेल तर पक्षसभासदत्वानें व पक्षाच्या इतर संबंधामुळें तो अधिक दृढतर होण्याची शक्यता नाहीं काय ? त्यामुळें हा युक्तिवाद देखील बिनतोड आणि मनाला पटण्यासारखा वाटत नाहीं.

कायदेमंळाच्या सभाप्रमुखानें पक्षाशीं सर्व संबंध तोडून टाकावेत व इंग्लंडचें अनुकरण करावें असें म्हणतांना एका गोष्टीची जाणीव मनांत ठेवली पाहिजे. एकतर तिकडच्या सभाप्रमुखाप्रमाणें आपल्याकडे देखील सभाप्रमुखाच्या जागेची निवडणूक लढविली जातां कामा नये. एकदां तो निवडून आल्यानंतर पुन्हां सभाप्रमुख म्हणून काम करण्याची इच्छा असे-पर्यंत त्याची जागा बिनविरोध निवडली गेली पाहिजे.

---

## वेल

शरीराच्या सत्रा व्याधी
संसाराच्या शतावधी
उरीं मात्र फुललेली
वेल एक साधीसुधी !

मुळें तिचीं गेलीं खोल
काळा फत्तर फोडून
गेलीं ताऱ्यांच्या किरणीं
बोटें फांद्यांचीं जुळून !

रोज रात्रीं झोपतांना
तिला एक कळी येते
आणि तिच्या सुगंधानें
रात्र सारी धुंद होते !

तिच्या पानापानांतून
आहे पोपटी नव्हाळी
उग्र ग्रीष्मानें सुकेना
तिची पालवी कोवळी !

अशी उरीं फुलताहे
वेल एक साधीसुधी
एक वेगळीच आहे
तिच्या संगतीची धुंदी !

—शान्ताराम रामचन्द्र








तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

# वाङ्मयाच्या श्रेष्ठतेचें रहस्य

## साहित्य : संस्कृतीची संपूर्ण प्रेरणा

साहित्याचें वा वाङ्मयाचें स्वरूप काय आहे व त्याचा व्याप केवढा आहे, याची कल्पना संमेलनांच्या योगानें यावयास पाहिजे. मानवी संस्कृतीची संपूर्ण प्रेरणा साहित्याच्या रूपानें प्रकट होत असते. अशी संपूर्ण प्रेरणा जोंपर्यंत साहित्यांत प्रकट होत नाहीं, तोंपर्यंत त्याला खरें कलेचें रूप आलें नाहीं, असें खुशाल समजावें. या व्यापक प्रेरणेचें स्वरूप समजावून सांगणारी विचारसरणी म्हणजेच साहित्यशास्त्र होय. प्राचीन साहित्यशास्त्रकार भामह म्हणतो कीं, चार पुरुषार्थांच्या विषयींचें विचक्षणत्व (द्रष्टृत्व) आणि कलांची प्रीति सत्काव्याच्या प्रणयनानें उत्पन्न होते.

## वाङ्मयाच्या वर्गीकरणाचा प्रश्न

कलात्मक वाङ्मयाचें स्वरूप व प्रकार हा मुद्दा आपणांपुढें चर्चेकरितां मी घेतों. हा मुद्दा पाश्चात्त्य टीकाशास्त्रानें अनेकवार चर्चिलेला आहे. त्यासंबंधीं त्या शास्त्रानें केलेला निर्णयहि अत्यंत प्रसिद्ध आहे. त्याचें चर्वितचर्वण मला करावयाचें नाहीं. त्या निर्णयाप्रमाणें वाङ्मयाचे दोन प्रकार पडतात. एक सर्जनशील (creative) वाङ्मय : यांसच ललित वाङ्मय अशी संज्ञा आहे. दुसरा प्रकार, सर्जनशील नसलेलें वाङ्मय : इतिहास, भूगोल, शास्त्रें, विज्ञानें, तंत्र-निबंध इत्यादि या दुसऱ्या प्रकारांत येतात. हें वर्गीकरण कवींना व टीकाकारांना साधारणपणें मान्य झालेलें आहे. इंग्लिशमध्यें व मराठीमध्यें नुसता 'Literature' व 'वाङ्मय' हा शब्द केवळ ललित वाङ्मयाकरितांच वाच्यार्थानें पुष्कळ वेळां वापरतात. मला या वर्गीकरणाबद्दल चर्चा उपस्थित करण्याचें नुकतेंच एक कारण घडलें. विश्वविख्यात गणिती व तत्त्वज्ञ बर्ट्रांड रसेल यांना गतवर्षी वाङ्मयाचें नोबेल पारितोषिक मिळाल्याची वार्ता वाचली. हें वाङ्मयाचें पारितोषिक रोमाँ रोलाँ, रवीन्द्रनाथ टागोर, आँद्रे जिड्, फ्रँको मोर्यो इत्यादि श्रेष्ठ ललित लेखकांना दिलेलें मला माहित होतें. रसेलला तें कां मिळावें ? त्याचें इंग्रजी भाषा बोलणाऱ्या जगावर छाप पाडणारें ललित वाङ्मय प्रसिद्ध नाहीं. एरवी त्याचे विपुल व विविध विषयांचें अवगाहन करणारे ग्रंथ व निबंध गेल्या पन्नास वर्षांत अव्याहत प्रसिद्ध झाले आहेत व होत आहेत. गणित, तर्कशास्त्र, तत्त्वज्ञान, नीतिशास्त्र, राजनीतिशास्त्र, समाजशास्त्र इत्यादि विद्यांच्या मध्यें फार महत्त्वाची भर त्यानें टाकली आहे. त्यानें गणिताचें विवेचन करून तर्कशास्त्रांत क्रांति केली आहे. त्याच्याइतके सर्वज्ञ जगाच्या पाठीवर किती सांपडतील ? शास्त्राचा गाभा सत्य होय. रसेल शास्त्रकार आहे. रसेलनें सत्य शोधण्याच्या प्रवासांत माणसाला सत्याच्या अधिक संनिध नेलें आहे; व त्याकरितां अधिक उच्च साधन, नव तर्कशास्त्राच्या रूपानें निर्मिलें आहे. परंतु त्यावरून वाङ्मयांत त्याला इतकें उच्च स्थान कां मिळावें या प्रश्नाचें उत्तर निघत नाहीं. तें काढण्याचा प्रयत्न मी करीत आहें. त्याकरितां वरील वर्गीकरणाचें पुनः मनन करण्याची गरज उत्पन्न होते. यासंबंधीं मनन सुरूं करण्यास

मराठी वाङ्मयपरिषद्, बडोदें येथें दिनांक १९ नोव्हेंबर १९५३ रोजीं झालेल्या तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्या अध्यक्षीय भाषणाचा कांहीं महत्त्वाचा भाग येथें उद्धृत केला आहे. —का. सं.

१. धर्मार्थकाममोक्षेषु वैचक्षण्यं कलासु च ।
प्रीतिं करोति कीर्तिं च साधुकाव्यनिबन्धनम् ॥ १।२ भामहालंकार०.








दुसरें एक कारण असें झालें कीं, पुण्यांतील साहित्यशास्त्रज्ञ डॉ. वाटवे यांनीं 'ज्ञानेश्वरी इत्यादि संतवाङ्मय काव्य आहे काय ?' असा मुद्दा काढला आहे. तें तत्त्वज्ञान आहे किंवा धर्मज्ञान आहे, परंतु प्रधान अर्थानें काव्य नव्हे – असा त्यांच्या मुद्द्याचा अभिप्राय आहे.

## वाङ्मयाची श्रेष्ठता

यासंबंधीं सुप्रसिद्ध विद्यमान इंग्लिश कवि व टीकाकार टी. एस्. ईलिअट 'धर्म आणि वाङ्मय' या निबंधांत काय म्हणतो तें पहा. मात्र त्याच्या प्रतिपादनानें या वर्गीकरणाचें समर्थन वा अधिक विशदीकरण होण्याऐवजीं त्याच्या फेरतपासणीची आवश्यकता उत्कटत्वानें भासूं लागते.

टी. एस्. ईलिअट म्हणतो, "पुढील मुद्द्यांचें मला विशेषतः समर्थन करावयाचें आहे. वाङ्मयसमीक्षा निश्चित अशा नैतिक आणि धार्मिक दृष्टिकोणानेंच करून पूर्ण केली पाहिजे. कोणत्याहि युगांत नैतिक व धार्मिक विषयांच्या बाबतींत जितक्या प्रमाणांत सामान्यपणें ऐकमत्य असेल तितक्या प्रमाणांत वाङ्मयसमीक्षा सार्थ होऊं शकेल. आपण ज्या युगांत राहतों त्या प्रकारच्या युगांत असें सामान्यतः ऐकमत्य सांपडत नाहीं. म्हणून खिश्चन वाचकांना ही गोष्ट आवश्यक आहे कीं, त्यांनीं आपल्या वाचनविषयाची समीक्षा करण्याकरितां, विशेषतः कल्पनारचित वाङ्मयाच्या कृती तपासतांना त्या स्पष्ट अशा नैतिक व धार्मिक प्रमाणांनींच तपासल्या पाहिजेत. वाङ्मयाचा श्रेष्ठपणा केवळ वाङ्मयीन कसोटीवरच निश्चित करतां येणें शक्य नाहीं. वाङ्मयीन कसोटीनें तें वाङ्मय आहे कीं नाहीं एवढेंच ठरवितां येईल. गेलीं कांहीं शतकें ही गोष्ट आपण गृहीत धरून चाललों आहोंत कीं, धर्मज्ञान आणि वाङ्मय यांचा कांहींच संबंध नाहीं. पण यावरून हें नाकारतां येत नाहीं कीं, वाङ्मय म्हणजे मुख्यतः कल्पनानिर्मित वाङ्मय. तें बहुतेक नेहमीं कांहीं नैतिक कसोटींच्या आधारावरच तपासलें गेलें आहे व तपासलें जात आहे. प्रत्येक पिढी जे नीतिनियम स्वीकारते त्यांच्या आधारेंच ती आपल्या वाङ्मयाचा नैतिक निर्णय करीत असते. मग ती प्रत्यक्ष त्या नियमांप्रमाणें जीवन जगत असो अथवा नसो...धार्मिक वाङ्मय हा शब्द ज्या अभिप्रायानें आपण वापरतों, त्याच अभिप्रायानें ऐतिहासिक वाङ्मय किंवा वैज्ञानिक वाङ्मय हाहि शब्द वापरतों. माझा अभिप्राय असा आहे कीं, बायबलचें प्रमाणभूत भाषांतर किंवा जरेमी टेलरचे ग्रंथ यांना वाङ्मय म्हणून आपण व्यवहार करतों. त्याच पद्धतीनें क्लॅरेंडन् किंवा गिबन् या दोन इंग्लिश इतिहासकारांचा इतिहास किंवा ब्रॅड्लेचें तर्कशास्त्र किंवा बफनचा निसर्गेतिहास हीं वाङ्मय होत म्हणून आपण व्यवहार करतों. हे सगळे लेखक असे लोक होते कीं, त्यांच्या विषयांत म्हणजे धर्म, इतिहास वा तत्त्वज्ञान या विषयांत लिहितांना त्यांना भाषेचें वरदान प्राप्त झालें होतें. ज्या मंडळींना त्यांच्या विषयांची आवड नाहीं ती मंडळीसुद्धां त्यांची सुंदर रीतीनें लिहिलेली भाषा वाचण्यांत आनंद प्राप्त करून घेतात. मी आणखी असें म्हणतों कीं, वाङ्मय म्हणून दर्जा असलेलें वैज्ञानिक, ऐतिहासिक, धार्मिक किंवा तात्त्विक पुस्तक कालांतरानें त्या त्या विषयाच्या बाबतींत वाङ्मय हें नातें वगळून पोकळ ठरलें तर वाङ्मय हाहि दर्जा त्यास राहणार नाहीं. कारण वैज्ञानिक किंवा इतर तत्कालीन मूल्य प्राप्त करूनच वाङ्मय हा दर्जा विशिष्ट काळीं त्याला मिळतो. वाङ्मय या नात्यानें त्याच्यापासून प्राप्त होणारा आनंद योग्य आहे हें मान्य करीत असतांना त्याच्या दुरुपयोगाचीहि तीव्र जाणीव मला अधिक होते. जीं माणसें त्यांच्या केवळ वाङ्मयीन गुणाचा आनंद लुटतात तीं खरोखर बांडगुळें होत. आपणांस माहीत आहे कीं, हीं बांडगुळें जेव्हां खूप माजतात,

2. 'Selected Prose', pp. 32–34.








तेव्हां ते घातक रोग बनतात. जे वाङ्मयज्ञ, बायबल हें वाङ्मय आहे, इंग्लिश गद्याचें तें उदात्ततम स्मारक आहे, असें म्हणून तन्मयतेनें डोलूं लागतात, त्यांचा मला राग येतो. जे इंग्लिश गद्याचें स्मारक म्हणून बायबलचा आदर करतात ते खिश्चन धर्माच्या थडग्यावर उभारलेलें स्मारक म्हणूनच त्याचा आदर करतात. माझ्या बोलण्यांतील अवांतर विषयांतर टाळण्याकरितां मी एवढेंच सुचवितों कीं, जर इतिहास, विज्ञान आणि तत्त्वज्ञान या नात्यानें त्यांचें महत्त्व घसरलें, तर क्लॅरेंडन्, गिबन्, बफन् किंवा ब्रॅड्ले यांचें वाङ्मयीन मूल्यहि घसरेल. त्याचप्रमाणें इंग्लिश वाङ्मयावर बायबलचा वाङ्मय या नात्यानें जो प्रभाव पडला आहे, त्याचें कारण ईश्वरी आदेशाचा तो संदेश आहे असें मानलें गेलें होतें म्हणून; तें वाङ्मय मानलें गेलें म्हणून नव्हे. विद्वान् लोक आतां त्याची वाङ्मय म्हणून चर्चा करतात ही, त्याचा वाङ्मयीन प्रभाव आतां संपला, याची खूण आहे. "

टी. एस्. ईलिअटच्या या म्हणण्यांतून असा अर्थ निघतो कीं, कविता, नाटक, कादंबरी, कथा, लघुकथा, इत्यादि प्रकारच्या वाङ्मयाचा जो कलात्मक महिमा आहे तो इतिहास, धर्म, तत्त्वज्ञान, विज्ञान इत्यादि बोधवाङ्मयाला किंवा बौद्धिक वाङ्मयाला सुद्धां असूं शकतो. किंबहुना धर्म, नीति इत्यादि बोधविषय किंवा इतिहास, निसर्ग, बौद्धिक तत्त्वें किंवा शास्त्रीय प्रमेयें यांच्या योगानें वाङ्मयाला श्रेष्ठता लाभते. कलेची श्रेष्ठता तिच्या अंतरंगांतील सत्याच्या महिम्यावर अवलंबून असते. मग तें सत्य जीवनांतलें असो वा विश्वांतलें असो; आत्मगत असो अथवा वस्तुगत असो. कला ही सर्जनात्मक असते. सर्जनात्मक वाङ्मय व अन्य वाङ्मय असें टीकाशास्त्रांतलें प्रसिद्ध वर्गीकरण करणारे टीकाकार इतिहास, चरित्र, तत्त्वज्ञान इत्यादि विषयांच्या वाङ्मयाला सर्जनात्मक नसलेलें वाङ्मय म्हणून मानतात हें अत्यंत चुकीचें ठरतें. डब्ल्यू. बेसिल वर्सफोर्ड यानें 'वाङ्मय-निर्णय' (Judgment in Literature, pp. 86-90) या निबंधांत इतिहास, चरित्र, निबंध इत्यादि वाङ्मय-प्रकार, सर्जनशील वाङ्मयांतून वगळले आहेत. ठोकळ मानानें वरील वर्गीकरण कलात्मक वाङ्मयाच्या किंवा ललित कलेच्या शास्त्रीय चर्चेस उपयुक्त ठरत असलें, तरी विशिष्ट मर्यादेच्या बाहेर उच्चतर अवस्थेंत कलेची तत्त्वसमीक्षा जेव्हां प्रवेश करते तेथें या वर्गीकरणाच्या मर्यादा लोप पावतात. बौद्धिक किंवा शास्त्रीय सत्यांचा ज्या प्रतिभेला विस्मयजनक अनुभव येत नाहीं ती प्रतिभा कलेचे आभास निर्माण करील; कला निर्माण करूं शकणार नाहीं. एवढें मात्र लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, सत्याचें वर्णन, प्रतिपादन, समर्थन वा संशोधन करणारें लेखन अथवा शास्त्रग्रंथ कलात्मक असतातच असा नियम नाहीं. कलात्मक सत्यप्रतीति आणि कलात्मक असलेलें सत्यज्ञान असा फरक मात्र वस्तुतः करावा लागतो.

चिरंतन कलात्मक वाङ्मय बहुशः कलात्मक सत्यानुभूति याच स्वरूपाचें असून मानवी संस्कृतीनें तें मानसिक समृद्धीच्या भांडारांत जतन करून ठेवलेलें आढळतें. परंतु शुद्ध काल्पनिक असें वाङ्मय — नाटक व महाकाव्य — हेंहि चिरंतन झालेलें दिसतें. त्यांत शास्त्रीय सत्य प्रमुखपणें विराजमान झालेलें दिसेलच असें नाहीं. किंवा वास्तविक घटनारूपी सत्यहि त्यांत केंद्रस्थानीं आढळेल असा नियम नाहीं. म्हणून सत्यावलंबी कलेचें आणि शुद्ध कल्पनानिर्मित विषयावर अवलंबित असलेल्या कलेचें महत्त्व किंवा तारतम्य कसें ठरवावें हा चिंतनीय प्रश्न आहे.

## माणूस व बाह्य विश्व यांचा सांधा : कल्पना

कलेची निर्मिति कल्पनेंतून होते. कल्पनेच्या रूपानें संचित अनुभव पुनः जन्म घेतो आणि नवें काल्पनिक जग निर्मितो.

या संबंधीं अधिक खोलपणें विचार करण्याची गरज आहे. कारण मनुष्याच्या माणुसकीचें अधिष्ठान जाणीव किंवा ज्ञान हें होय. कल्पनेशिवाय ज्ञान अशक्य आणि ज्ञानाशिवाय जगणें अशक्य. कारण माणसाची सर्जनप्रवृत्ति अथवा निर्माणशक्ति ही ज्ञानाधीन आहे व ज्ञान हें कल्पनाधीन आहे.

नवीनाचें सर्जन किंवा निर्मिति हें मनुष्यस्वभावाचें रहस्य आहे. कारण त्याशिवाय या जगांत जगणें त्याला अशक्य आहे. कल्पनाशक्ति (Imagination) निर्मितिशीलतेचा आविष्कार आहे. कला हें कल्पनेचेंच औरस अपत्य आहे. कल्पनेच्या योगानेंच मनुष्य भूत व वर्तमानकाल यांचा भविष्यकालाशीं सांधा जुळवूं शकतो. भविष्यकाळ म्हणजे अज्ञात. जीवनाचें प्रत्येक पाऊल त्या अज्ञातांत, अनंत व गहन काळोखांत, निःसंदेहपणें पडत असतें, तें कल्पनेच्या योगानेंच. कल्पना हें मानवी जीवनाचें साहस आहे. हें साहस सफल होतें, म्हणजेच जीवन शक्य होतें. कल्पनेच्या योगानेंच मनुष्याला भविष्यकालावर भरंवसा उत्पन्न होतो. दिवस उजाडेल, पाऊस पडेल, शेत पिकेल, औषधानें व्याधीचें शमन होईल, लग्न केल्यावर बायको नांदेल, राज्य स्थापिलें तर समाजाचें रक्षण होईल इत्यादि श्रद्धा कल्पनेंतून जन्मलेली असते. अनुभव हा कल्पनेवांचून आंधळा असतो. पदार्थाची डोळ्यासमोर नसलेली बाजू अनुभवांत कल्पनेनेंच शिरते. खाण्यापूर्वी आंबा रसाळ आहे, फोडण्यापूर्वी फणसांत गरा आहे, खणण्यापूर्वी जमिनीखालीं मूळ आहे – हें सुद्धां कल्पनेनेंच दिसतें. कारागीर, कारखानदार व प्रयोगशाळेंतील शास्त्रज्ञ यांच्या क्रिया अगोदर कल्पनेंत दिसणाऱ्या वस्तूंचीच निर्मिति करीत असतात. माणूस आणि जग यांचा समन्वय साधणारी शक्ति कल्पनाच होय. कल्पनेवांचून मनुष्यपिंड क्षणांत भूतलावरून नष्ट होईल.

जग किंवा निसर्ग आहे त्या स्वरूपांत ठेवून मनुष्य जगूं शकत नाहीं; म्हणून त्याच्यांत बदल करून म्हणजे नव निर्मिति करून जगण्याची परिस्थिति उत्पन्न करावी लागते. ही नव निर्मिति प्रथम कल्पनेच्या क्षेत्रांत होत असते. परंतु त्याकरितां मन वास्तविक अशा बाह्य विश्वांतील तथ्यां-(Facts)चा अनुभव सांठवून त्यावर कल्पना रचते. आपण ज्याला देश, काल, वस्तूंच्या जाती किंवा प्रकार, कार्यकारणभाव, संख्या, परिमाणें वगैरे अनुभवाचे विषय म्हणून समजतों, ते अनुभवाचे विषय नसून अनुभवाचा अर्थ करणाऱ्या कल्पनेच्या त्या रचना आहेत. शब्द आणि शब्दाचे अर्थ कल्पनेच्या पोटीं जन्माला येतात; ते प्राथमिक अनुभवाचे दर्शक नसतात.

प्रत्यक्ष समोर दिसणाऱ्या वर्तमान जगांत जें नसतें तें त्या जगाच्या पोटांतून काढण्याचें कार्य कल्पनेच्या साहाय्यानें मनुष्य करतो. आजचीं मानवी भौतिक साधनें आणि मानसिक मूल्यें नैतिक, धार्मिक, कलात्मक वगैरे सर्व प्रथम नव्हतीं. हें सर्व अवास्तवच होतें, शून्य होतें. शून्यांतून मानवी विश्व जन्मलें, जें नव्हतें तें अस्तित्वांत आणण्याचें कार्य मानवानें केलें. तें प्रथम कल्पनेंत अस्तित्वांत आलें; बाह्याकार उशीरा आला. अगोदर अवास्तव नंतर वास्तव, असा तो क्रम होय. कल्पना अवास्तव, अद्भुत व भ्रमात्मक घडविते, स्वप्नें व मनोराज्यें रचते; ही प्रवृत्ति अनिवार्यपणें माणसाच्या मनांत सुरू असते. कल्पनेला लागणारा रचावयाचा माल अंतरंगांत सांठलेला असतो. राग, द्वेष, मत्सर, लोभ, क्रोध, सुख, दुःख इत्यादि भावनांच्या वेषांत आलेले बाह्य सृष्टीचे अनुभव मनुष्याच्या अंतरंगांत संस्काररूपानें सांठतात. नव्या इच्छा व नव्या भावना जागृत झाल्यावर त्यांच्या योगानें प्रेरित झालेली कल्पना संस्काररूपानें सांठलेल्या वास्तविक अनुभवांच्या कच्च्या मालाचीं अवास्तव

3. 'Manual of Psychology' by Stout, pp. 565–80.








व अद्‌भुतरम्य चित्रें घडविते. ती मानवी अंतरंगालाच नवे आकार देते.

बाह्य विश्वांत बदल करून गरजा भागविण्याचीं नवीं साधनें जीवाला जरूर असतात. विश्वाच्या अंतरंगाला नवीं रूपें आणि नवे आकार आणण्याची म्हणजेच भौतिक समृद्धीची अदम्य इच्छा जीवाला असते. त्या अदम्य इच्छेंतून प्रथम मानवी अंतरंगांत अवास्तवाचीं नवीं रूपें व नवे आकार तयार होतात. वस्तुत: बाह्य विश्वाला आकार देण्याचीच ही अदम्य इच्छा होय; ती कालांतरानें सफल होते. तें अवास्तव वास्तव बनूं लागतें. इच्छेचें साफल्य प्रथम मानसिक जगांत, नंतर वास्तविक जगांत होतें. मानवी अंतरंगाला आणि विश्वाच्या अंतरंगाला रूपास आणि आकारास आणणारी शक्ति कल्पना होय. प्रथम काव्य तयार होतें; नंतर विज्ञान जन्माला येतें. कल्पनेच्या पोटीं जन्मलेली काव्यसृष्टि व विज्ञाननिर्मित भौतिक सृष्टि या कल्पनेच्या पोटीं जन्मलेल्या सहोदर भगिनी होत. कला, विज्ञान व भौतिक साधनें घडविणारी शक्ति कल्पना हीच होय.

## काव्याची वस्तुनिष्ठा

कला ही अंतर्मुख असते, याचा अर्थ ती बाह्यविश्वनिरपेक्ष मानसिक ( Subjective ) असते असें नव्हें. माणसाचें मन आणि विश्व यांचा सांधा म्हणजेच मानवी जीवन होय. तो सांधा निखळणें ही जीवननाशाची निशाणी होय. काव्यशब्द आणि रूपरसगंधस्पर्शशब्द इत्यादि अर्थ बाह्य विश्वच होत. कल्पित ( Ideal ) आणि मूर्त इंद्रियगम्य ( Concrete ) यांची त्यांत एकता असते.

गटे म्हणतो, "कवि व्यापक तत्त्वाकरितां मूर्ताचा आश्रय करतो कीं मूर्ताच्या स्वरूपांतच व्यापक तत्त्वाचें चिंतन करतो ? – या दोन गोष्टींत फार तफावत आहे. व्यापक तत्त्वाकरितां मूर्ताचा आश्रय करीत असेल तर तो सिद्धांताचें एक उदाहरण दाखवीत आहे, एवढाच अर्थ होतो. परंतु कवि जर मूर्तामध्यें व्यापक तत्त्व पहात असेल, तर तें पहाणें, हेंच काव्याचें खरें स्वरूप होय. मूर्त हें जिवंत झालेलें तत्त्व होय, हें ज्याला समजलें त्यालाच तत्त्वाचें आकलन होतें." हेगेलनें सांगितलेलें कलेचें स्वरूप म्हणजे "मूर्तिमंत झालेलें तत्त्व" किंवा "विशेष रूपास आलेलें सामान्य" किंवा "व्यक्तिरूप बनलेली व्यापकता" ( Concrete Universal ); हें सूत्र आहे.

टी. एस्. ईलिअट यानें, ललितकलेंत भावना ( Emotion ) हें मुख्य साध्य होय, किंवा भावनेची उभारणी हीच कला होय असें म्हटलें आहे. यावरून तो वस्तुनिष्ठेचें व बौद्धिकतेचें कलेंतील महत्त्व कमी समजतो, असें नव्हे. आत्मनिष्ठ कलाविषयक विचारसरणीला एका अर्थानें त्यानें झिडकारलें आहे. तो म्हणतो, "आपल्या व्यक्तित्वाचा सतत होम करीत राहणें हीच कलाकाराची प्रगति होय; त्याचें व्यक्तित्व सारखें अस्तमान पावावें लागतें. ज्या काळांत तो अधिक मूल्यवानाच्या पाठीमागें लागतो, तेव्हां त्याला स्वत:ला सारखी शरणागति पत्करावी लागते. व्यक्तित्वविसर्जनाच्या या क्रियेंत, जी परिस्थिति विज्ञानाला आवश्यक असते त्या परिस्थितींत, कला उभी असते."

भावनेच्या उभारणीबद्दल त्यानें असें म्हटलें आहे: "कवितेंत भावना सांगून चालत नाहीं; भावनेच्या समान मोलाचा विषय किंवा बाह्य वस्तु

4. "It makes a great difference whet her the poet seeksthe particular in relation to the universal or contemplates the universal in the particular .... .... [In the first case] the particular functions as an example, as an instance of the universal ; but the second, indeed, represents the very nature of poetry. He who grasps this particular as living essence also encompasses the universal."

5. 'Selected Prose' p. 26.



अनुक्रमणिका






( objective equivalence ) रचावी लागते. हीच कला होय. या रचलेल्या वस्तुस्थितींतूनच नवी कलाजन्य भावना उद्भवते. ही भावना नवी व निराळया प्रकारची असते. कलेच्या बाहेर असणाऱ्या कोणत्याहि प्रकारच्या अनुभवापेक्षां या अनुभवाचा आनंद निराळया प्रकारचा असतो. मात्र ह्या नव्या भावना स्वतंत्रपणें शोधून काढणें हें कवीचें काम नव्हे. सामान्य भावना (emotions) आणि सामान्य विविध प्रकारच्या जाणिवा ( feelings ) यांचा सांठा, त्यानें करावयाचा असतो. ज्या जाणिवा आणि भावना त्याच्या व्यक्तिगत खाजगी स्वरूपाच्या नसतात, त्या व्यक्त करणारा कवि अधिक उच्च दर्जाचा असतो."

## काव्य, तत्त्वज्ञान व नवे ध्येयवाद

ईलिअट् आणखी असें म्हणतो कीं, "आपण असें म्हणत असतों कीं, विचार हा कांटेकोर असतो, भावना अस्पष्ट असते. पण वस्तुतः कांटेकोर आणि अस्पष्ट अशा दोन्हीहि प्रकारच्या भावना असतात. कांटेकोर विचार व्यक्त करावयाला जशी श्रेष्ठ बौद्धिक शक्ति लागते, तशी स्पष्ट व कांटेकोर भावनेचा आविष्कार करण्यासहि ती आवश्यक असते. कारण प्रत्येक श्रेष्ठ कविता जीवनदृश्याचा उत्तम भास निर्माण करते. होमर, सोफोक्लिस, व्हर्जिल, डांटे किंवा शेक्सपिअर यांनीं निर्माण केलेल्या विश्वांत जेव्हां आपण प्रवेश करतों, तेव्हां आपण असें विश्व पहात असतों कीं, तें बौद्धिक स्वरूपानेंहि व्यक्त करतां येऊं शकेल. कारण प्रत्येक कांटेकोर स्पष्ट भावना बौद्धिक सूत्रानें व्यक्त होण्याकडे कलत असते. आपणांस या प्रसंगानें डांटेच्या उदाहरणाचा मोह होणें अगदीं बरोबर आहे. डांटेची कविता विशिष्ट बौद्धिक तत्त्वज्ञानाची प्रतिनिधिभूत आहे डांटेला एक विशिष्ट तत्त्वज्ञान आहे; म्हणून प्रत्येक श्रेष्ठ कवीला सुद्धां डांटेप्रमाणें श्रेष्ठ तत्त्वज्ञान असतेंच."

ईलिअट म्हणतो त्याप्रमाणें, तत्त्वज्ञानाच्या भूमिकेशिवाय श्रेष्ठ काव्य निर्माण होत नाहीं, हें जरी खरें असलें, तरी या मुद्द्याचा खुलासा मागील गटेच्या विवरणावरून व हेगेलच्या सूत्रानें अधिक चांगला करतां येतो. तत्त्वज्ञानांत जी पद्धति अवलंबून ज्या स्वरूपांत प्रमेयें मांडलेलीं असतात ती पद्धति व तें प्रमेयांचें स्वरूप काव्यांत प्रामुख्यानें नसतें. तर्कपद्धतीला व तार्किक रचनेला काव्यांत प्राधान्य नसतें. सहस्र ही संख्या कल्पनेंत येणें आणि सहस्र रुपये डोळयासमोर येणें यांत जो फरक आहे, तोच फरक तत्त्वज्ञानांत व तत्त्वज्ञानाची भूमिका असलेल्या काव्यांत असतो. काव्य बुद्धिगम्य तत्त्वांना इंद्रियगम्य आकार देतें. संख्यांची बेरीज व वजाबाकी मनाला हेलकावे देत नाहीं, परंतु प्रत्यक्ष आयुष्यांत चाललेली रुपयांची बेरीज व वजाबाकी मनाला हेलकावे देत असते. गणितांतील शुद्ध संख्या व्यावहारिक हिशेबांत मूर्तिमंत संख्या बनते. तसेंच तत्त्वज्ञानांतील शुद्ध तत्त्व काव्यांत मूर्तिमंत रूप धारण करतें. उपनिषदांतील केवल परब्रह्म आणि गोकुळांत अवतरलेलें गोपाळकृष्णरूपी परब्रह्म यांच्यांतल्या फरकाप्रमाणें हा फरक आहे. उपनिषदानें ज्ञान मिळून मुक्ति मिळते आणि भागवतांतील गोपाळकृष्णाच्या दर्शनानें भक्ति उमाळून मुक्ति मिळते. तत्त्वज्ञानाचें स्वरूप युक्ति व काव्याचें भक्ति हें आहे.

हा मुद्दा चर्चिण्याचें एक महत्त्वाचें कारण असें आहे कीं, मराठीमध्यें नवीन सामाजिक व राजकीय तत्त्वज्ञानांच्या पार्श्वभूमीवर नवीन काव्यें, कादंबऱ्या व लघुकथा निर्माण होऊं लागल्या आहेत. मार्क्सवाद, कम्युनिझम्, समाजवाद, राष्ट्रवाद, मानवतावाद यांचें अधिष्ठान धरून हें वाङ्मय निर्माण होत आहे. समाजाची विषम व अन्यायी रचना, वर्गकलह, मजुरांचे प्रश्न, शेतकऱ्यांची खालावलेली स्थिति, धनिकांचें स्तोम, सरंजामशाही, भांडवलशाही, पारलौकिक धर्मश्रद्धा इत्यादि विषयांचा परा-








मर्श हें वाङ्मय घेत आहे हे केवळ बौद्धिक प्रश्न नसून त्यांचा प्रत्यक्ष संबंध मानवी भावनांत व अनुभवांत गुंतला आहे. म्हणून साहित्याला या सामाजिक तत्त्वज्ञानाची पार्श्वभूमि अनुकूलच आहे. या सामाजिक तत्त्वज्ञानांनीं नवीं सामाजिक वा मानवीं ध्येयेंहि मांडलेलीं आहेत. त्यामुळें विविध अनुभव, जाणिवा व भावना यांना सुसंगत स्वरूप देण्याचें कार्यहि हे ध्येयवाद करतात. म्हणजे भावनांचा परिपोष करणारीं ध्येयसूत्रेंहि या विचारसरणींमध्यें सुव्यवस्थित स्वरूपांत सांपडतात. म्हणून त्या विचारसरणी वाङ्मयाला प्रेरणा देऊं लागल्या आहेत. त्या विचारसरणींचें स्वरूप ध्येयवादामुळें भावुक बनलें आहे; म्हणून त्या वाङ्मयाचें अवलंबन बनत आहेत.

पुष्कळ वेळां कलेच्या माध्यमापेक्षां साधकबाधक विचार मांडण्याची तर्कशास्त्रोक्त पद्धति हीच विचारसरणीला अधिक प्रभावी करूं शकते. कार्ल मार्क्सनें कम्युनिस्ट जाहिरनाम्यांत ४६ पृष्ठांत तर्कशुद्ध पद्धतीनें मांडलेला विचार जितका प्रभावी ठरला आहे, तितकें त्यासंबंधीं रचलेलें साहित्य प्रभावी झालेलें आढळत नाहीं. कित्येकदां भावनेपेक्षांहि विचार अनंत पटीनें परिणाम करितो, याचें हें उदाहरण आहे. पृथ्वीची दिशाच मार्क्सनें बदलून टाकली, तिच्या गतींत व तालांत नवीन विलक्षण आंदोलनें निर्माण केलीं.

काव्याला किंवा ललित वाङ्मयाला वादात्मक विचार व तर्कात्मक निर्णय संकुचित बनवितात, म्हणून विशिष्ट विचारसरणी, व्यापक सौंदर्यभावनेला पोषक होईल इतक्याच प्रमाणांत, अंगिकारली पाहिजे. त्या निष्ठेचा समाधिभंग होऊं नये; तिला विचलितपणा येऊं नये, इतक्या हळुवार पद्धतीनें ते विचार आत्मसात् केले पाहिजेत. बौद्धिक विचारसरणीच्या योगानें वस्तुस्थितीचा किंवा परिस्थितीचा अर्थ समजण्यास जशी मदत होते, तशी अडचणहि होते. बौद्धिक विचारसरणी म्हणजे वस्तुस्थितीचें संपूर्ण दर्शन नव्हे किंवा संपूर्ण अर्थहि नव्हे. अर्थशास्त्रें ज्याप्रमाणें आर्थिक व्यवहार समजण्यास मदत करतात त्याप्रमाणें मार्क्सवादासारखीं सामाजिक तत्त्वज्ञानें सामाजिक परिस्थितीचा अर्थ समजण्यास मदत करतात. अर्थशास्त्रांनीं आर्थिक व्यवहारांचा संपूर्ण अर्थ समजत नाहीं, किंवा संपूर्ण उलगडाहि होत नाहीं. कारण कोणतेंहि शास्त्र सर्वज्ञतेचा बाणा वाहूं शकत नाहीं. तीच गोष्ट मार्क्सवादासारख्या सामाजिक तत्त्वज्ञानासहि लागू आहे. प्रत्येक सामाजिक परिस्थितीच्या अनेक बाजू आणि कित्येक सामाजिक अनुभव या सामाजिक तत्त्वज्ञानांच्या कक्षेंतून सुटलेले असतातच. म्हणूनच ज्ञान व शास्त्रें प्रगति करूं शकतात. राहिलेल्या बाजू व अनुभव यांच्या नवीन उपपत्ती सांपडल्यामुळें त्यांची प्रगति होते. त्या त्या तत्त्वज्ञानाचे किंवा पक्षाचे अनुयायी व नेते उपपत्ति न लागणाऱ्या अशा उदाहरणांची, कांहींतरी शाब्दिक गडबडगुंडा करून उडवाउडवीचीं उत्तरें देऊन, विल्हेवाट लावतात, हें ओळखलें पाहिजे. कलाकारानें ध्येयवादी तत्त्वज्ञानांच्या मर्यादा ओळखूनच साहित्याची पार्श्वभूमि म्हणून त्यांचा स्वीकार करावा. कलाकाराच्या मनाची ठेवणच इतकी व्यापक पाहिजे. कारण बौद्धिक विचारमय अनुभवाच्या बाहेर राहिलेलें अनुभवाचें व भावनांचें विशाल क्षेत्रहि त्याच्या प्रतिभेच्या कक्षेंत मावलें पाहिजे. विशिष्ट बौद्धिक तत्त्वज्ञानें अनुभवाचा सगळा अर्थ समजावूं शकत नाहींत हें एकदां बाणलें म्हणजे विशिष्ट बौद्धिक विचारसरणीचे शुद्ध रस प्रतिभेच्या सुंदर तनूच्या पोषणाला मदत करतील परंतु त्या तनूला बाधणार नाहींत. वृक्षवल्लींच्या मुळांशीं उदकाचें सिंचन नित्य करावें, परंतु मुळें कुजणार नाहींत याची खबरदारी घ्यावी; हाच उदकाचा दृष्टांत बौद्धिक विचारसरणीलाहि लागू आहे. मार्क्सवादी वा समाजवादी कवींना व साहित्यिकांना समाजवाद हें








ध्येय मानवाचें अंतिम ध्येय म्हणून आणि समाजवादी तत्त्वज्ञान हें सत्याचा निष्कर्ष म्हणून दिसतें. त्यामुळें प्रतिभेचा साक्षात्कार आणि अनेक सूक्ष्म भावनांची तेजस्विता मंदावते. किंबहुना समाजवादी तत्त्वज्ञानावरच भावुकता केंद्रित होते त्यामुळें प्रतिभेच्या साक्षात्काराचीं द्वारें बंद होतात. बौद्धिक विचार हे प्रतिभेचें एक साधन असूनहि भावनेच्या केंद्रीकरणाच्या दोषामुळें त्यांचें बंधन बनतें. समाजवादी कवींचा आवेश, ललकाऱ्या, आक्रोश व शोक हे सर्व, चोखंदळ विचक्षण विदग्ध रसिकांना, अनेकवेळां विरस उत्पन्न करतात.

## धार्मिक तत्त्वज्ञानांची नितांत काव्यात्मता

श्रीमत् भागवत, योगवासिष्ठ, ज्ञानेश्वरी किंवा डांटेची दिव्य सुखांतिका हीं महाकाव्यें ज्या युगांत निर्माण झालीं त्या युगांत धार्मिक तत्त्वज्ञानावर भावुकता केंद्रित होऊन देखील प्रतिभेला भावुक साक्षात्कार उत्कट व प्रगल्भ रूपांत अनुभवता आला. याचीं कारणें दोन आहेत : एक तर असें कीं, धार्मिक तत्त्वज्ञानांत शुद्ध बौद्धिक किंवा तार्किक तंत्र मर्यादित प्रमाणांतच अवलंबिलेलें असतें. अनुभूतीचें जें विस्तृत क्षेत्र मानवी बुद्धीस अगम्य व अनाकलनीय म्हणून मोकळें सोडलेलें असतें, त्यांतच पौराणिकांचा स्वैर विहार चालतो. दुसरें असें कीं, शुद्ध बौद्धिक गृहीतकृत्यांच्या पेक्षां भावनांचीं किंवा श्रद्धांचीं अधिष्ठानें गृहीत धरूनच धार्मिक तत्त्वज्ञानें रचलीं गेलीं आहेत. हीं भावनांचीं व श्रद्धांचीं अधिष्ठानें म्हणजे काव्याची सकस तेजस्वी बीजेंच होत. व्यापक भावना हें मुख्य काव्यतत्त्व किंवा कलातत्त्व आहे. धार्मिक तत्त्वज्ञान कलेच्या कलानेंच आकार घेण्यास सज्ज असते किंवा कला धार्मिक तत्त्वज्ञानास त्याच्यांतील भावनाबळावरच समाविष्ट करूं शकते.

गंभीर भावुक श्रद्धा हा धार्मिक विचारसरणीचा गाभा किंवा स्थायी भाव होय. संसार दुःखमय आहे ही व्यापक संवेदना ( feeling ) भारतीय व खिश्चन धर्मांत प्रतिष्ठा पावली आहे. या बंधनभूत विश्वाच्या बाहेरचें स्वातंत्र्याचें निधान असलेली महान् सत्ता, किंवा या जगांतील अनंत वेदनांचा परिहार करणारें आनंदनिधान, किंवा या इंद्रियांच्या भ्रमांनीं, चंचल, क्षणिक व मिथ्या आभासांनीं, फसवणुकींनीं व वंचनांनीं भरलेल्या विश्वाच्या पलीकडे ज्ञानमय व शाश्वत सत्य असलें पाहिजे, अशी उत्कट व उदात्त वासना ( will ) चिंतनशील व सुटका करून घेऊं इच्छिणाऱ्या माणसाच्या हृदयांत उत्पन्न होते व त्याचा त्या वासनेच्या अनुरोधानें विचार तयार होऊन निर्णय होतो. या निर्णयाचाच अर्थ स्वर्ग, मोक्ष किंवा ईश्वर होय. सत्कर्मावरची पवित्र विधायक श्रद्धा आणि असत्कर्माबद्दलची पवित्र निषेधभावना माणसाला, विश्वांत न्याय असला पाहिजे अशा निर्णयाला नेऊन पोंचविते. सत्कर्माला नियमानें सुखरूपी फळ येत नाहीं आणि दुष्कर्माला दुःखरूपी फळ नियमानें येत नाहीं असें दिसल्यास या विधिनिषेधांवरील पवित्र नैतिक श्रद्धा ढासळूं लागतात. विश्वांत न्याय असलाच पाहिजे, या बौद्धिक निर्णयानेंच ती श्रद्धा खंबीर बनते. या नैतिक निर्णयाच्या सिद्धीकरितांच मरणोत्तर जन्माचा सिद्धान्त वा पुनर्जन्मवाद उभारला गेला. तात्पर्य असें कीं, संसारसंवेदना ( Feeling ), मोक्षवासना (Will) आणि नैतिक पावित्र्याची भावना ( Emotion ) यांच्या अत्यंत खोल व व्यापक आधारावर बौद्धिक विचारसरणी मागील धर्मयुगानें रचली. एकाच खोल व्यापक भावनारूप आधाराचीं हीं भिन्न पार्श्वरूपें ( aspects ) होत. ती व्यापक भावना म्हणजे अंतिम श्रेयाकडे असलेलें जीवनव्यापी आकर्षण होय. याच आकर्षणाची पूर्ति शांतरस होय. तर्कसरणी ही भावनेचें व श्रद्धेचें उपांग म्हणूनच धार्मिक तत्त्वज्ञानें मानतात. निष्कर्ष असा कीं, भावुक श्रद्धा हा धार्मिक तत्त्वज्ञानांचा आत्मा आहे. शब्दमय धार्मिक तत्त्वज्ञान हें त्या आत्म्याचें

शरीर आहे. म्हणजे तें तत्त्वज्ञानच काव्यमय आहे. स्थायी भावनेच्या सूत्रांत धार्मिक तत्त्वविचार गोंवला गेला आहे.

ही स्थायी भावना भारतीय साहित्यशास्त्रकारांनीं परिगणित केलेल्या शृंगार, वीर, करुणादि रसांच्या स्थायी भावांपैकीं आहे कीं नाहीं हा प्रश्न अत्यंत गौण आहे. हजारों वर्षांचा मानवी इतिहास धर्मश्रद्धेच्या वरिष्ठ प्रभावाची साक्ष देत आहे. त्यानें ही स्थायी भावना सिद्ध केली आहे. या धार्मिक स्थायी भावनांच्या परिपोषार्थ धार्मिक तत्त्वज्ञानांतील तर्कशास्त्र खर्ची पडतें. काव्यास तर्कशास्त्र किंवा युक्तिवाद हा बहिष्कार्य नसतो. कुमारसंभव, किराता-र्जुनीय, नैषध इत्यादि महाकाव्यांत अनेक ठिकाणीं तार्किक युक्तिवाद आला आहे. त्यानें काव्यशोभा वृद्धिंगतच केली आहे. त्याला प्राधान्य नसलें म्हणजे झालें. कोणतेंहि धार्मिक तत्त्वज्ञान तर्कशास्त्राला दुय्यमच मानतें. भावुक श्रद्धेलाच तेथें मूर्धाभिषेक असतो. ती श्रद्धा विकास पावून तिला परा भक्ति, परमशांति किंवा कृतकृत्यता या अनुभवांत परिणत करण्यास लागणारीं सर्व साधनें व तन्त्रें मान्य ठरतात. धार्मिक तत्त्वज्ञानाचा सत्यनिर्णय हा जरी उद्देश असला तरी त्यामुळें त्याच्या काव्यत्वाला तें मागें टाकीत नाहीं. कारण स्थायी भावनेच्या परिपोषाचें तें एक लक्षण बनतें. त्यांतला सत्यनिर्णय हा रसात्मकच असतो. रसाची ती परम सीमा असते. काव्याच्या किंवा कलेच्या आनंदांत इतका श्रेष्ठ दर्जाचा आनंद निर्माण करण्याचें भाग्य इतर कोणत्याच काव्याला लाभणें शक्य नाहीं. ती धार्मिक श्रद्धा, ती अगाध नैतिक निष्ठा, दृश्य विश्वाला शून्य करून, ब्रह्मांडाला गिळून अनंत आनंदाचें निधान जिंकून देणारें शौर्य इतर काव्यांना लाभत नाहीं. काव्याला प्रतिपाद्य विषय लागतोच. तो जितका मानवी मनाचा ठाव घेणारा असेल, तितकें काव्य महत्त्वाचें ठरतें. ईश्वर हा विषय सत्य आहे कीं नाहीं हा प्रश्न बाजूला टाकला तरी तो परमसुंदर आहे याविषयीं कोणीहि, नास्तिक सुद्धां शंका उत्पन्न करणार नाहीं.

मार्क्सवाद, समाजवाद, राष्ट्रवाद, मानवतावाद इत्यादि विचारसरणी गृहीत धरून लिहिलेलें ललित वाङ्मय किंवा काव्य उच्च दर्जाचें बनत नाहीं. याचें दुसरें कारण असें कीं, धार्मिक तत्त्वज्ञानात्मक काव्य ज्या पूर्वयुगीन सामाजिक वातावरणांत निर्माण झालें त्यांतील सामाजिक भावुक श्रद्धा त्या काव्याचें अधि-ष्ठान होती. तशा सामाजिक भावुक श्रद्धेचें व्यापक अधिष्ठान या नव विचारसरणीच्या साहित्याला सांप-डत नाहीं. त्या जुन्या जगाची धर्म ही मूळ निष्ठा होती. तें जग धार्मिक भावनांत जन्मलेलें व त्यांतच स्थिरावलेलें होतें. नव्या विचारसरणीच्या ध्येयवादांना अशी सर्वसमाजव्यापी दृढमूल व्यक्त निष्ठा सांपडलेली नाहीं.

## काव्यांतील कल्पना व तिचें बंधन

वाङ्मयाचा विषय काल्पनिक असला तरच तें वाङ्मय, ललित वाङ्मय होय हा मुद्दा ललित वाङ्मयाच्या प्राथमिक पाठाला म्हणजे बालवर्गाला सांगण्याची गरज असली तरी तो उच्च दर्जाच्या साहित्यशास्त्रांत फार कमी मोलाचा ठरतो. कलात्मक उच्च अनुभूति काल्पनिकांतच निर्माण होते आणि ती वास्तविकांत निर्माण होत नाहीं, असें मुळींच नाहीं. आणखी असें कीं, समग्र सौंदर्याचे आदर्श वास्तविक विश्वानें किंवा निसर्गानेंच प्रतिभेला दाखविलेले असतात. काल्पनिक रचना वास्तविकाचा मागोवा घेतच कल्पना रचते.

योवर असा एक आक्षेप येऊं शकतो कीं 'कल्पनारम्य व अद्भुत अशा अवास्तवावरील ललित साहित्यांतील कल्पनेला बंधनें नसतात आणि शास्त्रां-तील कल्पनेला बंधनें असतात; आणि तें बंधन म्हणजे प्रमाणांचें वा तर्कशास्त्राचें बंधन होय. हा कलेतील कल्पनाव्यापारांत आणि शास्त्रांतील कल्पनाव्यापारांत असलेला मूलभूत फरक होय, म्हणून शास्त्र व साहित्य

हें सारखेंच कल्पित होय, हें म्हणणें बरोबर नाहीं.' यावर पहिलें उत्तर असें आहे कीं, नियमबद्ध नाहीं, असें कांहींच असूं शकत नाहीं. सरस व नीरस, उचित व अनुचित किंवा सुंदर व बेडौल इत्यादि भेदांचीं प्रमाणें लागतातच. दुसरें उत्तर असें कीं, तर्कशास्त्र किंवा प्रमाणपद्धति हें शास्त्रांतील कल्पनेचें बंधन नसून साधन आहे. शास्त्र प्रत्यक्षाला स्वतःप्रमाण मानतें, तसेंच साहित्य साक्षात्काराला प्रमाण मानतें. प्रत्यक्ष हें प्रमाणभूत आहे कीं नाहीं याची जशी शास्त्र तपासणी करतें, तसेंच साहित्य देखील प्रमाणभूत सौंदर्यानुभूति कोणती, याचें शोधन करीत असतें. नव कवि मर्ढेकर म्हणतात–" भावनेला येउं दे गा शास्त्र-कांय्याची कसोटी. " या प्रतिपादनाचा असा अर्थ नव्हे कीं, शास्त्र व काव्य, यांच्यांतील कल्पना-व्यापाराचे कांहीं नियम भिन्न प्रकारचे नाहींत. शास्त्राला सत्याचें ज्ञान करून द्यावयाचें असतें आणि कलेला स्वयंपूर्ण अनुभूति द्यावयाची असते, हा महत्त्वाचा फरक आहे. सत्यज्ञान या कलात्मक अनुभूतीचा एक धागा होय.

## आधुनिक प्रतिभेची वास्तवपरता

ललित वाङ्मयाच्या इतिहासाचा आढावा घेत असतांना एक महत्त्वाची गोष्ट ध्यानांत भरते. ती अशी कीं, वास्तवाच्या बाहेरच्या अद्भुत काल्पनिक रचना प्राचीन युगांत जितक्या प्रमाणांत निर्माण झाल्या व महत्त्वास पावल्या, तशा आधुनिक युगांत निर्माण होत नाहींत व महत्त्वास पावत नाहींत. कादंबऱ्या हें आधुनिक युगांतील विशेषतः लोकशाही मूल्याच्या जगांतील गद्य महाकाव्य होय.

आधुनिक युगांतील कलेचा वास्तवाकडील ओढा उत्पन्न होण्याचें मुख्य कारण असें : वास्तवजगाच्या अंतरंगांतील सामर्थ्यावर आधुनिक मानवाचा कबजा इतका वाढला आहे कीं, मध्ययुगांतील किंवा प्राचीन युगांतील माणूस तो कबजा पाहून आश्चर्यानें स्तंभित होईल! वास्तव निसर्गापुढें अत्यंत दुर्बल ठरलेल्या पूर्वमानवाच्या क्लैब्याच्या जाणिवेंतून पूर्वयुगांतील अद्भुत काल्पनिकाचा पसारा निर्माण झाला. आतां वास्तव निसर्गाची शक्ति वश झाल्यामुळें व तज्जन्य आत्मविश्वासामुळें वास्तवावरील विश्वास, आदर व प्रेम वाढलें आहे. मानवामध्यें अजाणपणेंच वास्तवा-वर अगाध भावुक श्रद्धा वसत आहे. ती पराभूत झाल्यामुळें ती मुरडून विपर्यस्त झाली व अंतर्मुख होऊन तिनें मिथ्या असलेल्या अद्भुतरम्य काल्पनिकाला निर्माण केलें. तिला आतां स्वाभाविक विस्ताराला अवसर लाभला आहे, म्हणून वास्तवपर वाङ्मयाचा महिमा वाढूं लागला आहे. पूर्वीच्या माणसाच्या प्रतिभेपेक्षां नव्या माणसाच्या प्रतिभेला संचार करण्याचें अत्यंत विशाल असें क्षेत्र नव्यानें प्राप्त झालें आहे.

## चरित्र-इतिहास-इत्यादींची कलात्मकता

ललित किंवा कलात्मक वाङ्मयाच्या मर्यादा अमर्याद होत चालल्या आहेत. तथाकथित सर्जन-शील वाङ्मयाशिवाय निराळे नवे वाङ्मयप्रकार अस्तित्वांत आले आहेत. आत्मचरित्र, चरित्र, इतिहास, निबंध, प्रवासवर्णन, ऐतिहासिक भूगोल, सामान्यसुलभ विज्ञान इत्यादि सत्यप्रतिपादनाच्या उद्देशानें लिहिलेलें वाङ्मय हेंहि कलात्मक किंवा ललित 'वाङ्मय' म्हणून मान्य होऊं लागलें आहे. तें सर्जनशील नाहीं, हें म्हणणेंच हास्यापद ठरूं लागलें आहे. कारण सर्जनशीलतेला वास्तवाचा व प्रमाणांचा आधार अधिक सामर्थ्य देतो याबद्दल आतां वाद होऊं शकत नाहीं. शास्त्रकाराला बौद्धिक ज्ञानानुरोधी जेवढें मनांत असेल त्याची संगति निर्माण करून त्याचा साक्षात्कार घ्यावा लागतो व कलाकारास स्वयंपूर्ण अनुभूति उत्पन्न करण्याकरितां मनांत जेवढें उपयुक्त असेल त्याची संगति निर्माण करून चिंतन करावें लागतें.

आत्मचरित्र, चरित्र, निबंध, इतिहास, तत्त्व-








ज्ञान, प्रबंध इत्यादिकांना कलात्मक वाङ्मयाचें वास्तविक पूर्ण स्थान कां मिळतें हा प्रश्न उत्पन्न होणें स्वाभाविक आहे. कारण सत्य बरोबर सांगता येणें ही त्याची मुख्य कसोटी आहे, सौंदर्यानुभव देण्याची योग्यता ही दुय्यम कसोटी आहे असें साधारणपणें सकृद्दर्शनीं म्हणतां येतें. परंतु हा आक्षेप दोन कारणास्तव खोडून निघतो. पहिलें कारण असें कीं, अनेक आत्मचरित्रें महाकाव्यांशीं तुल्यबल सौंदर्यानुभूति निर्माण करतात. केवळ त्यांच्या भाषाशैलीमुळ व कलात्मक तंत्रामुळेंच असा सौंदर्यप्रत्यय येत नाहीं; तर त्यांचा भावार्थच इतका रमणीय किंवा भव्य असतो म्हणून. रेनाँ यानें लिहिलेलें खिस्तचरित्र पाश्चात्य वाङ्मयाला ललामभूत झालें आहे. रूसोनें लिहिलेलें आत्मचरित्र एक नवी ओजस्वी शैली देऊन चिरस्थायी झालें आहे. बॉस्वेलनें लिहिलेलें सॅम्युएॅल जॉन्सनचें चरित्र अत्यंत वेधक वाङ्मयाचा नमुना म्हणून गाजलें आहे. गेल्या शतकांत अनेक कलाकारांनीं व कादंबरीकारांनीं लिहिलेलीं आत्मचरित्रें व थोर पुरुषांचीं चरित्रें त्यांनीं स्वतः तयार केलेल्या चित्रांशीं व कादंबऱ्यांशीं स्पर्धा करीत असतात. आपल्याकडेहि रम्य व भव्य म्हणून गाजलेलीं चरित्रें व आत्मचरित्रें पुष्कळ आहेत. रवीन्द्रनाथ टागोर, पं. जवाहरलाल नेहरू, स्वातंत्र्यवीर सावरकर व महात्मा गांधी यांच्या आत्मकथा हें थोर वाङ्मय आहे. श्री. एम्. एन्. रॉय हे अत्यंत विस्तृत आत्मकथा लिहीत असून ती खंडशः प्रसिद्ध होत आहे. तें एक महाकाव्यच होऊं पहात आहे. मराठीमध्येंहि सरस आत्मकथा अनेक प्रसिद्ध झाल्या आहेत. त्यांतील लक्ष्मीबाई टिळकांच्या स्मृतिचित्रांची सहृदयता खुल्या मनानें वाङ्मयकार मान्य करतात. कवि व नाटककार आचार्य अत्रे यांचें वाङ्मयीन आत्मशोधन हें सत्यबोधन तर आहेच, त्याबरोबर त्यांतील सत्यहि अत्यंत सुंदर बनलें आहे. त्यांतील त्यांची कारागिरी प्रमाणबद्ध आहे. वाङ्मयांत मूर्धाभिषिक्त झालेले, ही प्रमाणबद्धतेची गरज कलेला फारच असते हें विसरून, वाङ्मयाचे पिंजारी बनतात. पिंजलेला वाङ्मयाचा कापूस शरदृतूंतील शुभ्र ढगांची शोभा निर्माण करतो; परंतु ती दीर्घकाल टिकणारी नसते. चरित्रांप्रमाणेंच इतिहासग्रंथहि कलात्मक वाङ्मयांत शोभूं शकतात. लक्ष्मणराव भावे यांचें 'महाराष्ट्रसारस्वत' हें वाङ्मयेतिहासाचें पुस्तक वाङ्मय या नात्यानें सुभग आहे. निबंधवाङ्मय हें कलात्मक वाङ्मयांत गणतां येतें. याचें एकच चिपळुणकरांच्या निबंधमालेचें उदाहरण संशयनिरास करण्यास पुरेसें आहे. शास्त्रीय व तत्त्वज्ञानविषयक प्रबंधांत मराठी वाङ्मयाला अभिमान वाटावा असे दोन प्रबंध प्रसिद्ध आहेतः एक लोकमान्य टिळकांचें 'गीतारहस्य' व दुसरा वामन मल्हार जोशी यांचा 'नीतिशास्त्रप्रवेश.'

## वैचारिक सत्य व कलानुभूति यांचें नातें

कलात्मक अनुभव हा ज्ञान नव्हे, किंवा बौद्धिक विचार नव्हे, ती एक परिपोष पावलेली भावना असते—या कलाविषयक सिद्धांताला या ठिकाणीं वरील मुद्द्यामुळें बाध येतो कीं काय, अशी जबर शंका येते. कोणास असें म्हणतां येईल कीं, चरित्र, इतिहास इत्यादि वाङ्मयांत जी कलात्मक अनुभूति असते तिला आपण अवास्तव महत्त्व देऊं नये. कारण तेथें सत्यप्रतिपादन झालें कीं नाहीं, यालाच महत्त्व देणें योग्य होय. तेथें कलात्मक अनुभूति व सत्याचें ज्ञान यांचें एकत्रीकरण झाल्यामुळें कलेचा दर्जा मिळतो इतकेंच मानलें पाहिजे. म्हणून दुसरें अधिक महत्त्वाचें समर्थन जर मिळूं शकत नसेल तर निर्भेळ कलावाङ्मयापासून त्यास अलग केलें पाहिजे. तें सर्जनशील आहे, हें मात्र मान्यच करावें लागेल. कारण सर्वच विचार सर्जनरूप असतो. हें सर्जन किंवा निर्मिति सत्यज्ञानस्वरूपी असतें, असें मान्य केलें म्हणजे झालें.












यास उत्तर दोन प्रकारच्या उपपत्तींनीं देतां येतें. त्यांतील पहिली उपपत्ति क्रोचेच्या विवरणांत सांपडते. तो म्हणतोः[6] " कलाकार व कवी आणि सर्व काव्यज्ञ व कलावेत्ते यांचा कल असें मानण्याकडे झुकलेला असतो कीं, कला हीच उच्चतम व शुद्धतम असते, ती वस्तुतत्त्वाचें खऱ्याखुऱ्या तन्मयतेनें झालेल्या ज्ञानाचा आकार होय......याचा अभिप्राय असा आहे कीं विचार हा व्यवहारांतील अडचणींतून व नैतिक पेंचांतून सोडवितो पण क्रमाक्रमानें; परंतु काव्यच एकटें झगड्यांतून, अडचणींतून विजयशाली मुक्ति एकदम करून देतें. व्यावहारिक वासनांच्या जंजाळांतून त्यावेळीं आपण बाहेर पडतों. काव्य हें ज्ञान आहे असें म्हणतां येतें, याचा अर्थ असा आहे कीं, तें ज्ञान शुद्धचिंतन आणि साक्षात्काररूप असतें. तो धार्मिक, तार्किक किंवा समीक्षात्मक विचार नसतो. पुष्कळ तत्त्ववेत्त्यांना हें शुद्ध चिंतनात्मक ज्ञान म्हणजे काय हें समजत नाहीं, म्हणून ते या सिद्धांताचा अव्हेर करतात. ते असें म्हणतात कीं, त्याचें पृथक्करण करीत असतां हा अपुरा आणि अस्पष्ट असा विचार आहे, असें उघडकीस येतें. तो सुधारावा लागतो आणि दुरुस्त करावा लागतो. मनाच्या काळोखांतील एका भागाचा म्हणजे संवेदनां- ( Feelings ) चा अंशच त्यांत मुख्य असतो. परंतु त्यांचें हें म्हणणें बरोबर नाहीं. व्यावहारिक कर्मकटकट आणि यातना यांच्या जगांतून मुक्त करण्याचें कवितेचें कार्य तिच्या झळाळणाऱ्या सौंदर्याचें फळ होय. सत्यविषयक आणि नैतिक कल्याणात्मक समाधान म्हणजे हें सौंदर्य नव्हे. परंतु हें एक दिव्य आनंदास प्रसवणारें विश्वाचें दर्शन आहे. "

क्रोचेची ही उपपत्ति म्हणजे एक प्रकारचें कलेचें गूढवादी तत्त्वज्ञान होय. काव्यामध्यें सर्व विश्व विषयीभूत होतें, ही गोष्ट मात्र कलेच्या अनेक तत्त्वदर्शनकारांना मान्य आहे. भामहानें म्हटलें आहे कीं,[7] "जो काव्याचें अंग होत नाहीं असा शब्द नाहीं, अर्थ नाहीं, नियम नाहीं किंवा कलाहि नाहीं. कवीवर केवढा मोठा बोजा आहे ! "

जॉन ड्युई या अमेरिकन तत्त्ववेत्त्यानें कलात्मक अनुभवावर एक मोठा प्रबंध लिहिला आहे. त्यांत त्यानें प्लेटो वा ॲरिस्टॉटल्पासून क्रोचेपर्यंत झालेल्या कलासमीक्षकांचे विचार तपासून मानसविज्ञानावर आधारलेली उपपत्ति मांडली आहे. मानसविज्ञानावरच नव्हे तर जीवविज्ञान व एकंदर विज्ञान लक्षांत घेऊन त्याच्याशीं सुसंगत होईल अशी ती उपपत्ति मांडली आहे. त्यामुळें गूढवादी वा अध्यात्मवादी साहित्यसमीक्षांचा व कलातत्त्वदर्शनांचा अस्पष्टपणा व वैचारिक गोंधळ उघडकीस आला आहे.

जॉन ड्युई म्हणतोः[8] " समग्र, सुसंगत व स्वयंपूर्ण अनुभव हाच कलात्मक अनुभव होय. कलेच्या बाहेरचा अनुभव म्हणजे कोणत्यातरी विशिष्ट मानसिक प्रवृत्तीला अधिक प्राधान्य देऊन, इतर मानसिक प्रवृत्तींना दाबणारा, विरोध करणारा किंवा उपेक्षिणारा तो अनुभव असतो. असे अनुभव तीन प्रकारांत विभागतां येतात. एक भावनाविष्ट, दुसरा बौद्धिक व तिसरा व्यावहारिक. भावनात्मक अवस्थेंत सगळ्या प्रवृत्तींना एका भावनेच्या सूत्रांत गोंवलें जातें. भावना ही उत्तानरूपांत असल्यामुळें सुंदर वाटत नाहीं. बौद्धिक अनुभवांत सत्यनिर्णयाकडे ओढा असतो व त्यांतील इतर भाग साधन म्हणून दुय्यम ठरतात. व्यावहारिक अनुभवांत बाहेरच्या व्यवहाराला म्हणजे

6. ' My Philosophy ' 137 – 52.
७. ' न स शब्दो न तद्वाच्यं न स न्यायो न सा कला।
जायते यन्न काव्याङ्गमहो भारो महान् कवेः ' ॥ ५।४ भामहालंकार.
8. Art as Experience, pp. 46 – 57 and 245 – 97.

परिस्थितीशीं घडणाऱ्या बाह्य वर्तनाला प्राधान्य असतें. तो अनुभव केवळ साधन म्हणूनच असतो. भावनामय, बौद्धिक व व्यावहारिक अनुभव यांच्यांत जसा कोणत्यातरी एका बाजूला कल असतो तसें कलात्मक अनुभवांत नसतें. कलात्मक अनुभवांत समग्रता असते म्हणजे सगळया अनुभवांचा समतोलपणा राखला जातो. ''

## गुणात्मताच सौंदर्य, गुणकेंद्रित विचार कलाबीज

परंतु जॉन ड्युई यानें ' तत्त्वज्ञान व संस्कृति ' या प्रबंधांत आजपर्यंतच्या कलाविषयक उपपत्तींना अत्यंत क्रांतिकारक वळण देणारा विचार सांगितला आहे. तो विचार मान्य केल्यास शुद्ध बौद्धिक विचाराचीहि कलात्मकता मान्य करावी लागेल.

जॉन ड्युई म्हणतो कीं, सौंदर्यात्मक अनुभव तेव्हांच होतो कीं, जेव्हां कोणताहि अनुभव एकांगीपणा टाकून एकात्मक, संपूर्ण वा समग्र (Integral) बनतो. अनुभवाची एकात्मता, संपूर्णता वा समग्रता हेंच अनुभवाचें सौंदर्य असें तो म्हणतो. अनुभवाच्या घटक अंशांची संवादी मांडणी झाली म्हणजे सौंदर्य उत्पन्न होतें. यावरून सौंदर्याचें व्यापक लक्षण वा स्वरूप काय याचाहि थांग लागतो. कलेंतील अथवा मानवी विश्वांतीलच नव्हे तर समग्र विश्वांतील सौंदर्याचें गमक लक्षण यांत मिळतें. अंगसंगति हें तें लक्षण होय. अंगसंगतीमुळेंच वैविध्याला एकात्मता प्राप्त होते. सर्व अंगांची संगति म्हणजेच पूर्णता होय. ज्ञात विश्वांतील कोणत्याही वस्तूचें व सत्याचें स्वरूप अंगसंगतींतच प्रकट होतें. यासच वस्तूचा स्वभावधर्म किंवा गुण अशी संज्ञा आहे.

एकदां हें सौंदर्याचें गमक मिळालें कीं, कलेची व्याप्ति वाढते. जेथें जेथें अनुभवाला समग्रता, एकात्मता वा पूर्णता लाभते तेथें तेथें तो कलात्मक अनुभव ठरतो. जॉन ड्युई यानें या संबंधीं आपल्या कलाविषयक ग्रंथांत प्रथम सूत्रपात केला आहे आणि ' तत्त्वज्ञान व संस्कृति ' या ग्रंथांत त्याचें त्यासंबंधीं विस्तृत असें निश्चित विधान केलें आहे. आपल्या कलासंबंधींच्या ग्रंथांत तो म्हणतो, ''अत्यंत तपशीलवार अशा तत्त्वज्ञानात्मक किंवा वैज्ञानिक संशोधनांत आणि अत्यंत महत्त्वाकांक्षी अशा औद्योगिक किंवा राजकीय प्रयत्नांत जेव्हां भिन्न भिन्न घटकांची सुसंगति स्थापन होऊन समग्र अनुभव निष्पन्न होतो, तेव्हां त्या अनुभवाला सौंदर्यगुण लाभतो. कारण तेव्हां त्याच्या विविध भागांची, एकमेकांत संलग्न होऊन सांखळी बनते. ते भाग नुसते, एकामागून दुसरा, असे येत नाहींत आणि त्या अंशांच्या मधून अनुभवलेली सांखळी उत्कर्षपूर्तीकडे सरकत जाते आणि समाप्त होते, कालांत नुसती विराम पावत नाहीं. आणखी असें कीं, जाणिवेंत ती उत्कर्षपूर्ति कार्य पुरें होण्याच्या अगोदरच येऊन प्रकाशित होते, कार्य पुरें होण्याची वाट पहात नाहीं. हा आगाऊच उत्पन्न झालेला विचार असतो, आणि त्याचा आस्वाद पुनः पुनः विशेष आतुरतेनें चाखला जात असतो.''

हें विधान कलासमीक्षकांना आणि टीकाशास्त्रज्ञांना विलक्षण धक्का देणारें आहे. साधारणपणें, ज्ञान हें सुंदर आहे, जीवन ही कला आहे, राजकारण ही कला आहे, ग्रंथलेखन ही कला आहे, संशोधन ही कला आहे—असलीं विधानें नेहमीं ऐकण्यांत येतात व त्यांचा अर्थ लाक्षणिक किंवा प्रशंसात्मक म्हणूनच स्वीकारला जातो. जान ड्युईच्या कलेच्या तत्त्वदर्शनाचा हा अत्यंत वाच्यार्थानें निश्चित केलेला असा सिद्धांत आहे. या सिद्धांताला पोषक अशा फार मोठ्या कीर्तिशाली कवींचीं व साहित्यकारांचीं विधानें सांपडतात. कीट्स्, शेली, कार्लाइल् यांच्या, काव्य म्हणजे सत्य किंवा सत्याचें पूर्ण ज्ञान, अशा अर्थाच्या उक्ती प्रसिद्ध आहेत; त्यांचें सयुक्तिक समर्थन ड्युईच्या ग्रंथांत मिळतें.

## कलारचनेचें तर्कशास्त्र

' तत्त्वज्ञान आणि संस्कृति ' या ग्रंथांत ड्युईनें









अनुक्रमणिका

या सिद्धांताचें विवरण करीत असतां कलात्मक रचनेचें आणि सौंदर्यास्वादाचें तर्कशास्त्र कोणतें, तें दाखविलें आहे. " कलारचनेचें तर्कशास्त्र हें सहज जातां जातां लक्षांत घ्यावयाच्या गोष्टीपेक्षां अधिक मूल्याचें आहे; मग ती रचना चित्राची, संगीताची, मूर्तीची, मंदिराची, नाटकाची अथवा कादंबरीची असो. जेव्हां कलाकार कलेचें तर्कशास्त्र किंवा बौद्धिक विचारसरणी अमान्य करतात, तेव्हां त्याचा अर्थ असा असतो कीं, त्यांच्या कलारचना म्हणजे परंपरागत तर्कशास्त्राचे नियम मोडून पडल्याचें प्रमाणच होय. मात्र ही अमान्यता कित्येक वेळां विशेष प्रावीण्य मिळविलेल्या कलाकारवर्गाच्या अहं-पणाचें प्रमाण नाहीं, एवढेंच ठरवून घेतलें पाहिजे. अशी पुष्कळशीं कलेचीं म्हणून नांवाजलेलीं कामें असतात कीं, त्यांत अनेक अंश कसेबसे जुळविलेले असतात. एका अंशाचा गुण दुसऱ्या प्रत्येक अंशाच्या गुणाला बळ देतो, विस्तार आणतो, असें होत नाहीं. या परिस्थितीवरून हेंच प्रकट होतें कीं, त्या रचनेंत गुंतलेला विचार सदोष आहे. विरुद्ध उदाहरणानें हा दोष चांगला व्यक्त करतां येतो. उदाहरणार्थ, उत्कृष्ट बौद्धिक व तर्कशास्त्रपूर्ण रचनांचा गुण पहावा. त्या रचनांच्या प्रणेत्यांचें मन त्या रचनेच्या मुळाशीं असलेल्या गुणावर सतत केंद्रित राहतें व हा गुणविषयक विचार रचनाकाराच्या सर्व विचारांचें नियमन करतो; अधिष्ठानभूत गुण हाच त्या रचनेचें वैशिष्ट्य दाखवितो, तिला बाहेरून मर्यादा घालतो व आंतून एकात्मता आणतो. कलाकाराचें हेंच तर्कशास्त्र आहे. मी ज्याला गुण-केंद्रित विचार म्हणतो, तेंच हें तर्कशास्त्र होय. अगदीं प्रथम गुणकेंद्रित विचार आला पाहिजे. त्याच्याशिवाय वळणदारपणा, संवादिता, तालबद्धता, प्रमाणशीरपणा आणि काटकसर हे अवांतर गुण केवळ तांत्रिक दृष्ट्या सौंदर्यगुणाला व्यक्त करतील. या अवांतर गुणांचें मूल्य सौंदर्यसमीक्षेच्या रूपानें तेव्हांच व्यक्त होतें कीं जेव्हां प्रधानभूत गुणाची खोली आणि उत्कर्ष निर्माण करण्यास ते उपयोगी पडतात, असें दाखवितां येतें. "

## विज्ञान ही स्वतंत्र कलाच

अशा प्रकारें प्रतिपादन करून एक महत्त्वाचा निर्णय ड्युई घोषित करतो, "कलात्मक विचाराचेंच हें पृथक् लक्षण नव्हें. कलात्मक विचार सर्व प्रकाराच्या विचाराचें उत्कट वैशिष्ट्य दाखवितो. एका-

9. ........ " Artistic thought is not however unique in this respect but only shows an intensification of a characteristic of all thought. In a looser way, it is a characteristic of all non-" scientific " thought. Scientific thought is, in its turn, a specialized form of art, with its own qualitative control. The more formal and mathematical science becomes, the more it is controlled by sensitiveness to a special kind of qualitative considerations. Failure to realize the qualitative and artistic nature of formal scientific construction is due to two causes. One is conventional, the habit of associating art and esthetic appreciation with a few popularly recognized forms. The other cause is the fact that a student is so concerned with the mastery of symbolic or propositional forms that he fails to recognize and to repeat the creative operations involved in their construction. Or, when they are mastered, he is more concerned with their further application than with realization of their intrinsic intellectual meaning. " —

John Dewey – Philosophy and Civilization, p. 104.








अर्थी सैलपणें असें म्हणतां येतें कीं, तांत्रिक नसलेल्या, ' वैज्ञानिक ' नसलेल्या , सर्व प्रकारच्या विचाराचें हें वैशिष्ट्य आहे. अधिक पुढें जाऊन असें म्हणतां येतें कीं , गुणात्मक अनुसंधानाचें नियंत्रण गृहीत धरलें म्हणजे वैज्ञानिक विचार ही स्वतंत्र आकाराची कला होय असें ठरतें. विज्ञान शुद्ध व गणितात्मक जितकें अधिक बनतें, तितकें तें स्वतंत्र प्रकारच्या गुणात्मक अनुसंधानांच्या सूक्ष्म जाणिवेनें नियंत्रित केलें जातें. शुद्ध वैज्ञानिक रचनेचा गुणात्मक व कलात्मक स्वभाव न ओळखण्याची चूक दोन कारणांनीं झाली आहे. पहिलें कारण म्हणजे रूढि; सर्वसाधारणांना मान्य झालेल्या कांहीं थोड्याच रचनांना कला म्हणून ओळखण्याची आणि त्यांचा कलास्वाद घेण्याची संवय. दुसरें कारण असें कीं वैज्ञानिक संकेतचिन्हें आणि अवांतर विधानें यांच्या मांडणीवर प्रभुत्व आणण्यांतच विज्ञानाचा विद्यार्थी गढून जातो आणि विज्ञानाच्या रचनेमध्यें जे नवनिर्मितीचे व्यापार असतात ते ओळखण्याची व अभ्यासण्याची उपेक्षा करतो, अथवा जेव्हां तो अशी उपेक्षा न करतां , त्यावरहि प्रभुत्व मिळवितो , तेव्हां अंतरंगीय बौद्धिक रहस्यापेक्षां त्यांचा उपयोग करण्याकडे त्याचें लक्ष अधिक वेधलें जातें. ''

## सुसंगत व सर्जनशील तत्त्वविचारहि कलात्मक

या प्रतिपादनाच्या प्रारंभीं प्रस्तावनेंत जो प्रश्न उपस्थित केला होता, त्याचें उत्तर ड्युईनें सांगितलेल्या वरील तत्त्वविवेचनावरून संपूर्णपणें मिळतें. रसेलचें वाङ्मय या सौंदर्याच्या व कलेच्या कसोटीला पूर्ण उतरतें. रसेलचा विचार सर्जनशील आहे. त्यानें तर्कशास्त्राचा एक नवा मार्ग निर्मिला आहे. रसेलच्या वाङ्मयांतील विचारांची सोनसांखळी सुरेखपणाचा नमुना आहे. त्याच्या वाङ्मयांत अथपासून इतिपर्यंत विचार कोठेंहि न अडखळतां पूर्णतेला पोंचतो, सत्यनिष्ठा ही भावना निरामयरीतीनें परिणतीला पोंचत जातें, सत्यसंशोधन हा हेतु सबंध विचारक्रियेशींही एकरूप बनतो, विचाराचा प्रत्येक धागा त्या सत्याचा सुवर्णतंतु बनलेला असतो. म्हणून विचाररूप अनुभवाची एकात्मकता तेथें प्रतीत होते. सत्याचें मंगल दर्शन या विचारमंदिरांत पाऊल टाकल्यापासून सुरू होतें व शेवटीं चिंतक त्या चिन्मय सत्याच्या दर्शनांत समाधि प्राप्त होऊन एकमय होऊन जातो. इच्छा, भावना व बुद्धि यांचा त्रिवेणीसंगम अशा थोर विचारवंतांच्या ग्रंथांत झालेला सांपडतो.

संगीत आणि गणित हे कलेच्या आदर्श अवस्थेस पोंचलेले प्रकार आहेत. गणिताच्या जोडीला शुद्ध तर्कशास्त्रहि येतें. किंबहुना गणित हें शुद्ध तर्कशास्त्राचेंच एक व्यक्त रूप आहे. संगीतांतील विचार स्वरसंगतीच्या साक्षात्कारांत, संवेदना आरोहावरोहांत व तालबद्धतेंत, भावना रागरागिणींत आणि माध्यम हें कलेंत एकरूप होऊन संगीत सिद्ध होतें; ध्वनि किंवा स्वर यांच्याहून निराळें जणूंकांहीं कांहींच शिल्लक राहात नाहीं. हें मानवी मनाचें उच्चतम आविष्करण आहे. पक्ष्याचें गाणें म्हणजे तो सगळा पक्षी; त्याचें तरल व नाजुक जीवित त्याच्या गरजांसह त्याच्या ध्वनीमध्यें प्रत्ययास येतें. संगीत हेंहि तसेंच आहे. मानवाच्या मनाचें तें बाहेर प्रकट झालेलें केवलरूप आहे. तसेंच गणित हें मानवाच्या आत्म्याचें प्रकट रूप आहे. शुद्ध चैतन्य हें आत्म्याचें स्वरूप आहे व तेंच सत्याचें मूळ रूप आहे. सत्य म्हणजें अबाधित, व्यापक व अनिवार्य तत्त्व. त्यांतला कोणताहि अंश दुसऱ्या अंशापासून वेगळा करून टाकतां येत नाहीं. गणित व शुद्ध तर्कशास्त्र असेंच अबाधित, व्यापक व अनिवार्य असतें. त्यांतील कोणताहि अंश दुसऱ्या अंशापासून वेगळा करून टाकतां येत नाहीं. हाच कलेचाहि आदर्श आहे. कलेची सुसंगति हें रूप गणितांत पूर्णतेस प्राप्त झालें आहे. गणिताचा विश्वविख्यात महापंडित रसेल हा आपल्या सर्वगामी








बुद्धिमत्तेनें व मानवताव्यापी सहानुभूतीनें प्रेरित होऊन उच्च कलात्मक विचार वाङ्मयरूपानें निर्माण करूं शकला. कारण त्याचें गणितज्ञान हें त्याच्या मानसिक जीवनांत एकरूप झालें आहे.

## प्रतिपादनाचें सार

या सर्व प्रतिपादनाचें असें सार आहे कीं, वास्तव आणि सत्य हेंच कलेचें अंतिम लक्ष्य असल्यामुळें शास्त्र आणि काव्य हे दोन्ही वाङ्मय-प्रकार कलात्मकच मानले पाहिजेत. वास्तवाला आणि सत्याला आत्मवश करणें हीच कला होय. विश्वशक्तीला आत्मवश करणें हेंच कलेचें साफल्य आहे. माणसाचें असामर्थ्य आणि क्लैब्य हरण करणें, त्याची दृष्टि विश्वाच्या परिघाला वळसा घालील इतकी क्रांतदर्शी करणें, हेंच कलेचें स्वरूप आहे.

शास्त्र आणि काव्य यांची जे फारकत करतात ते वाङ्मयांतील सत्याचा, विवेकाचा, प्रकाशच नष्ट करीत असतात, हें त्यांस कळत नाहीं. वास्तवा-नुसारी व ज्ञानाच्या पार्श्वभूमीवर पोसलेला समग्र अनुभव जर साहित्याचें सार नसेल तर आंधळ्या भावनांचा आणि उन्मत्त वासनांचा तो नाच होय, असेंच म्हणावें लागेल. असें वाङ्मय मानवाला दीर्घ अंधतमांत नेऊन सोडील. याकरितां साहित्य-समीक्षक व टीकाकार यांनीं आपलीं एकांगीं टीकाशास्त्रें व मागासलेलीं साहित्यशास्त्रें सुधारून घ्यावींत. कमी पल्ल्याचीं तोटकीं हत्यारें पराभवाचीं साधनें बनतात, तशी हीं साहित्यशास्त्रें व टीकाशास्त्रें बनत आहेत.

जीवनास वाङ्मयांतून सत्यानुसारी शुभ प्रेरणा प्रकट व्हावयास पाहिजे व अशा प्रेरणेंतूनच वाङ्मय निर्माण व्हावयास पाहिजे. वाङ्मयानें मनुष्याचीं मानसिक व भौतिक सामर्थ्यें वाढलीं तरच तें वाङ्मय सरस्वतीचें खरें रूप होय असें म्हणतां येईल. नियतीच्या बंधनांतून आणि जीवनांतील पारतंत्र्यांतून मनुष्याला मुक्त करणारें वाङ्मयच सरस्वतीचें वास्तव रूप होय, असें म्हणतां येईल. वाङ्मयाच्या श्रेष्ठतेचा अंतिम निकष नैतिक आहे. त्याकरितां राजशेखरानें म्हटलें आहे: ‘ वाङ्मयं द्विविधं, शास्त्रं काव्यं च ’ हा सिद्धांत साहित्यपरिषदांनीं आणि संमेलनांनीं उपेक्षिला तर त्यांच्या साहित्याची काळ उपेक्षा करणार नाहीं. कालावर स्वार होणारें वाङ्मय हें माणसाला त्रिभुवनावर विजय मिळविणारा वीर बनवितें. तुकारामानें म्हटलें आहे कीं, ‘ आम्ही विठ्ठलाचे गाडे वीर । कळिकाळासी दरारा ॥ ’ विठ्ठल हा चैतन्यघन आहे.

---

## अनंत मरणें अशीं मरावीं !

पोटीं जरि अंधार सांचला
ओठीं नक्षत्रांना ल्यावें
सोन्याचा देऊन मुलामा
लेणें कथलाचें चढवावें !
चिखलामध्यें उभे राहूनी
कमलापरि अन् वरीं हंसावें
जहरी हालाहल प्राशुनिया
नीलकंठ मी नित्यच व्हावें !
स्मरतें आहे तरी विसरावें
दिसतें आहे तरि न पहावें
आर्त जरी किंकाळ्या उठती
कानांवरतीं हात असावे !
क्षणाक्षणाला, कळूनसवरून,
ही गळचेपी अशी करावी
आपुल्याच हातानें आम्ही
अनंत मरणें अशी मरावीं !

— प्रद्युम्न टंकसाळी










श्री. म. मु. शारंगपाणि

# मनोगंडांचें गंडांतर

मराठी भाषेमध्यें मनोगंड हा शब्द नवीनच प्रचारांत आलेला नसून बरेच दिवसांपासून रूढ झालेला आहे. विशेषतः लघुकथांमधून व इतर ललित लेखनांतून हा शब्द अनेकदां वापरला जातो. मनोगंड कसे उद्भवतात व त्यांचे विविध प्रकार काय आहेत याविषयीं सामान्य वाचकांना फारशी माहिती नसली तरीहि पुष्कळ शिक्षित लोक न्यूनगंड हा शब्द अनेकदां वापरतात असें दिसतें. मनोगंड उत्पन्न होणें म्हणजे मानसिक व्यथेचें तें एक चिन्ह होय याची कल्पना सर्वांनाच पूर्णपणें आकलन झालेली आहे असें नाहीं. मनोगंड व त्याबद्दलचें सांगोपांग विवेचन हा मनोविश्लेषणवादांतील एक अतिशय महत्त्वाचा भाग होय. मनोगंड कां उत्पन्न होतात, त्यांचे प्रकार कोणते, त्यांचे दुष्परिणाम काय व त्यांचें विसर्जन करून मन पुनः निरोगी कसें करावयाचें याचा ऊहापोह व विवेचन मनोविश्लेषणशास्त्रांत फ्रॉइड, युंग व ॲडलर यांनीं विस्तृतपणें केलेलें आहे. आधुनिक मानसशास्त्रांत मनोविश्लेषणाला महत्त्वाचें स्थान प्राप्त झालेलें असल्या-मुळें मनोगंडविषयक चर्चा करणें आवश्यक आहे.

मनोगंडांची यथार्थ कल्पना येण्यासाठीं प्रथमतः मनोविश्लेषणवादाच्या पूर्वपीठिकेची कल्पना येणें जरूर आहे. या वादाचा प्रमुख प्रणेता व्हिएन्ना येथील डॉ. फ्रॉइड हा होय. अनेक मनोव्यथांनीं जर्जर झालेल्या रोग्यांचा अनुभव फ्रॉईड यानें घेऊन या अनुभवावरच त्यानें मनोविश्लेषणवाद आधारलेला आहे. मानस-शास्त्रांत वर्तनवाद, पूर्णतावाद (Gestalt Psychology), प्रेरणावाद वगैरे जे अनेक वाद आहेत त्यांपैकीं मनोविश्लेषणवाद हा एक असल्यानें मानसशास्त्राचा अभ्यास करणाऱ्याला या वादाकडे दुर्लक्ष करून चाल-णार नाहीं. मनोविश्लेषणवाद हा प्रेरणावादाचें एक उपांग आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. मनुष्याचें वर्तन व त्याच्या कृती या मुख्यत्वेंकरून प्रेरणेवर अव-लंबून असतात. मॅकडूगल यांच्या मतें प्रेरणांमधून उत्पन्न होणाऱ्या शक्तींवरच मनुष्याची कृति किंवा वर्तन अवलंबून असतें. फ्रॉईड व त्यांचे अनुयायी यांना अर्थातच या प्रेरणाशक्तीचें महत्त्व मान्य आहे म्हणून मनोविश्लेषण प्रेरणावादावर अवलंबून आहे, हें सांगावयास नकोच. प्राण्यांच्या ठायीं ज्या निरनिरा-ळया चौदा उपजत प्रेरणा आहेत, त्यांमुळेंच त्यांचें बाह्य सृष्टींत वर्तन घडून येत असतें. अर्थातच कांहीं प्रेरणांमधून उत्पन्न होणारी शक्ति अधिक, तर कांहीं प्रेरणांमधून निर्माण होणारी शक्ति कमी प्रमाणांत आढ-ळून येते. जिज्ञासा-प्रेरणा ही वात्सल्यप्रेरणेइतकी सबल नाहीं. फ्रॉईड यांनीं मनाचे दोन भाग किंवा कप्पे कल्पिलेले असून त्यांना जाणीव (Conscious) आणि नेणीव (Unconscious) अशीं नांवें दिलेलीं आहेत. स्टॅन्ले हॉल यानें पाण्यांत तरंगणाऱ्या बर्फाच्या तुकड्याशीं मनाची तुलना केलेली आहे. तरंगणाऱ्या बर्फाच्या तुकड्याचा एकअष्टमांश भाग पाण्याच्या पृष्ठ-भागावर असून उरलेला सात-अष्टमांश भाग पाण्यांत बुडलेला असतो, त्याप्रमाणें मनुष्याच्या मनाचा फारच थोडा अंश जाणीवयुक्त असून बाकी सर्व नेणीव-युक्त असतो असा हॉल यांचा युक्तिवाद आहे. या नेणीव-मनोभागांत कृतीला चालना देणाऱ्या मूळ प्रेरणा असतात व या नेणीव-भागांतील विचार व भावना जाणीवेच्या भागांत येण्यासाठीं प्रयत्न करीत असतात. ज्या कृतींची मनुष्याला पूर्णपणें जाणीव आहे व ज्या विचारपूर्वक केल्या जातात अशा कृतींच्या मुळाशीहि नेणीवयुक्त मनःशक्ति आढळून येते. अशा नेणीव भागाला फ्रॉईड यांनीं 'इड्' म्हणजे 'तच्छक्ति' असें नांव दिलें आहे. व त्यावर असलेल्या भागाला 'एगो' (अहंकार) व 'सुपर-एगो' (वरिष्ठ अहंकार) अशीं नांवें दिलेलीं आहेत. इड्च्या म्हणजे तच्छक्तीच्या भागामध्यें प्राणी पुरातन कालापासून उत्क्रांत होईतोंपर्यंत त्याला ज्या ज्या अनुभूती मिळत गेल्या त्यांचा परिपाक असतो. हल्लींच्या उत्क्रांत सामाजिक जीवनांत








या पुरातन शक्तींना संपूर्णतया वाव देतां येणें लोकहिताच्या दृष्टीनें शक्य नसल्यानें त्यांना आवरून धरण्याचा 'एगो' व 'सुपर-एगो' यांजकडून प्रयत्न केला जातो. फ्रॉईड यांनीं ही कल्पना स्पष्ट समजावी म्हणून घोडेस्वाराचें उदाहरण घेतल आहे. नेणीवेचा मनोविभाग हा घोडा असून घोडेस्वार हा 'अहकार' विभाग आहे. घोडा बेफामपणें चौफेर उधळूं लागला म्हणजे स्वाराला त्याचें नियमन करितां येत नाहीं. त्याप्रमाणेंच प्रेरणा-शक्ती अतिशय उच्छृंखल झाल्यास त्यांना 'अहंकार' आवरून धरू शकत नाहीं. या शक्तींचें नियमन न केल्यास अनेक मानसिक रोग उत्पन्न होतात. फ्रॉईड, युंग आणि ॲडलर या तिघांनीं अशा रोगांचें निदान ठरविण्याचा यत्न केला आहे. ॲब्रॅहम् व डॉ. जोन्स यांनींहि मनोविश्लेषणाचा खोल अभ्यास करून या वादांत सांपडणाऱ्या तत्त्वांची छाननी केली आहे.

मनुष्यांत ज्या विविध प्रेरणा आहेत त्यांना योग्य नांव मिळून त्यांचें विशिष्ट कृतींत रूपांतर झालें पाहिजे. जर सर्व प्रेरणांना सामाजिक निर्बंध पाळूनहि व्यवस्थित वाव मिळाला तर मनुष्याचें मन निरोगी राहूं शकेल. तथापि कांहीं कांहीं प्रेरणांच नियमन करावें लागतें व त्या दाबून टाकाव्या लागतात. अशा प्रकारच्या अतिनियमनाला फ्रॉईडनें 'रिप्रेशन' असें नांव दिलेलें आहे. प्रेरणाशक्ती दाबून टाकल्यास निरनिराळ्या प्रकारचे मनोगंड उत्पन्न होतात. मनोगंड निरनिराळ्या नांवांनीं ओळखले जात असले तरी सर्व प्रेरणामूलक आहेत ही गोष्ट निर्विवाद होय. प्रेरणाशक्तींचें अतिनियमन केल्यानें मनोगंड उत्पन्न होतो आणि त्यामुळें मनुष्य ज्या कृती करूं लागतो त्यांचें सकारण समर्थन करण्याचा यत्न करतो. अशा मिथ्यासमर्थनास 'रॅशनलायझेशन' हें नांव दिलेलें आहे. बाह्य सृष्टींत किंवा सामाजिक जीवनांत घडून येणाऱ्या गोष्टींच्या आघातापासून बचाव करण्यासाठीं जो युक्तिवाद मनुष्य मांडूं लागतो अशा मिथ्यायुक्तिवादाला किंवा निरर्थक कृतींना 'डिफेन्स मेकॅनिझम' असें म्हणतात. प्रेरणाशक्तीवर अतिशय निर्बंध घालून ती शक्ति अयोग्य ठिकाणीं केंद्रीभूत केल्यास मनोगंड निर्माण होतो. उदाहरणार्थ,—चिन्हगंड ( Fetichistic Complex ) असलेला मनुष्य स्त्रीवर प्रीति न करितां तिच्या पायांत असलेल्या चपलांवर आपल्या भावना केंद्रित करितो व त्यांतच अयोग्य रीतीनें त्याला समाधान व संतोष मिळतो. प्रेरणेंतून उत्पन्न होणाऱ्या भावशक्ती ज्या वस्तूशीं निगडित होतात त्याला भावविषय (Object cathexis) म्हणतात. मनोगंड उत्पन्न झाल्यास प्रेरणाशक्तीचें नियमन करण्याकडे मनोबळाचा अनाठायीं खर्च केला जातो व असा गंड कक्षाबाहेर गेल्यास मनुष्य वेडा होतो. मनोगंडांच्या मुळें माणसाच्या वागणुकीवर दुष्परिणाम घडून येतात व त्याच्या शरीराचा आणि बुद्धीचा ऱ्हास होऊं लागतो. मनोविश्लेषणशास्त्रांत जे गंड महत्त्वाचे मानले जातात त्यांपकीं कांहीं खालीं दिले आहेत:

**पितृगंड** (Oedipus – Complex) : हा गंड मनोविश्लेषणवादांत सर्वांत अधिक महत्त्वाचा मानलेला आहे. फ्रॉईड यांच्या मतें बहुतेक सर्व लहान मुलांच्या ठायीं हा गंड असतो. पुत्राला मातेविषयीं जी प्रीति वाटते त्यांत अजाण लैंगिकतेची छटा असते असें मनोविश्लेषणवादी सांगतात. अर्थात् लैंगिकता हा शब्द फार व्यापक अर्थानें मनोविश्लेषणांत योजिला जातो असें या वादाच्या पुरस्कर्त्यांचें म्हणणें आहे. पुत्राला मातेविषयीं प्रीति वाटून तो पित्याला आपला प्रतिस्पर्धी समजतो व त्याचा द्वेष करू लागतो. ईडिपस् नांवाच्या राजानें नरसिंहाकृति स्फिंक्सनें घातलेलें कोडें सोडविल व आपल्या बापाचा वध करून त्यानें अजाणतेपणानें आपल्याच आईशीं विवाह केला. या प्राचीन ग्रीक कथेवरून 'ईडिपस् गंड' हें नांव पडलें आहे. आपली चूक कळून आल्यावर ईडिपस्नें स्वतःला घोर शासन केल असा कथाभाग आहे.

**मातृगंड** ( Electra Complex) : हा मनोगंड मुलींच्या मनांत निर्माण होतो. पित्याविषयीं प्रीति वाटूं लागून त्या आईचा द्वेष करूं लागतात आणि तिला आपली वैरीण मानतात. इलेक्ट्रॅविषयीं जुनी ग्रीक कथा आहे. तिला वाटणाऱ्या मातृद्वेषानें तिनें जीं कृत्यें केलीं त्यांना अनुलक्षून या गंडाला 'इलेक्ट्रॅ गंड' असं नांव दिलें आहे. आधुनिक मानसशास्त्रांत 'ईडिपस् व इलेक्ट्रॅ' हे वेगळ मनोगंड न मानतां एकच 'ईडिपस् गंड' हें नांव द्व्यर्थी योजिलें जातें. या मनोगंडावर बरीचशी टीका करण्यांत आली असून अनेक सयुक्तिक आक्षेपहि घेण्यांत आलेले आहेत. प्रत्येक लहान मुलाच्या ठायीं हा गंड असला तरी बुद्धिविकासा-








बरोबर तो नाहींसा होतो असा मनोविश्लेषणवाद्यांचा युक्तिवाद आहे.

वरील दोन गंडांच्या खालोखाल स्वप्रीतिगंड (Narcissus Complex ) हा मनोविश्लेषणशास्त्रांत महत्त्वाचा मानला जातो. ज्या व्यक्तीमध्यें या गंडाचा उद्भव झालेला असतो ती स्वतःवरच प्रीति करूं लागते आणि तिचें लक्ष बाह्यसृष्टीकडे वेधलें जात नाहीं. स्वतःलाच ती विश्वाचें केंद्र मानूं लागते आणि आपल्या प्रीतीला स्वतः शिवाय दुसरें स्थान नाहीं असें मानते. हा गंड असलेला मनुष्य पूर्णपणें स्वार्थपरायण बनून दुसऱ्याच्या हितासाठीं कांहींहि करूं शकत नाहीं. रॅग्नेर या जर्मन कादंबरीकारानें स्वप्रीतिगंड असलेल्या स्त्रीचें वर्णन केलें आहे. आरशासमोर उभी राहून ही स्त्री स्वतःला उद्देशून भाषण करते, स्वतःलाच शाबासकी देते आणि स्वतःची कींव करते. नार्सिसस्च्या जुन्या ग्रीक कथेवरून या गंडाला नांव देण्यांत आलें आहे. नार्सिसस् नांवाच्या तरुणावर एको या वनदेवतेचें प्रेम होतें. तथापि तो तिजकडे दुर्लक्ष करी. एके दिवशीं पाण्यांत पडलेलें स्वतःचें प्रतिबिंब पाहून तो इतका आनंदित झाला कीं, ओढ्याच्या कांठीं तो बसला होता तेथून तो हालेना. शेवटीं देवांना त्याची दया येऊन त्यांनीं या तरुणाला फुलाचें रूप दिलें. आणि हें फूल त्याच्याच नांवानें ओळखलें जातें. अल्पवयी बालकांमध्यें हा गंड दिसून येतो असें विश्लेषणवैज्ञानिक म्हणतात. कारण त्यांच्या मतें सर्व लहान मुलें आत्मलक्षी असतात. बाह्य जगांतील व्यक्तींचा आणि वस्तूंचा आपल्याला काय उपयोग होईल एवढाच त्यांचा दृष्टिकोण असतो. मी, माझें आणि मला या कल्पनांची जाणीव प्रथम होते आणि हळूहळू जगांतील आपलें खरें स्थान काय याची व्यक्तीला ओळख पटते. जोंपर्यंत अशी जाणीव झालेली नाहीं तोंपर्यंत अशा व्यक्तीच्या शब्दांत व कृतींत अहंता व स्वार्थपरायणता प्रामुख्यानें दिसून येते.

**श्रेष्ठतागंड** ( Superiority Complex ) : आपण स्वतः इतरांपेक्षां श्रेष्ठ आहोंत आणि आपल्याप्रमाणें बुद्धिमान्, सुंदर किंवा उत्तम व्यक्ति कोणतीच नाहीं अशी भावना या गंडानें उत्पन्न होते. श्रेष्ठतागंडाचा संबंध 'नार्सिसस् गंडा'शीं आहे असें स्पष्टपणें कळून येण्यासारखें आहे. नार्सिसस् गंडाचें निराकरण झाल्यावरहि व बाह्यविश्वाकडे वास्तवतेनें पहाण्याचा दृष्टिकोण स्वीकारल्यावरहि स्वतःला वाजवीपेक्षां ज्यास्त महत्त्व देण्याच्या उर्वरित प्रवृत्तीमुळें हा गंड तयार होतो. प्रत्येकाच्या ठायीं स्वत्वप्रेरणा असतेच. परंतु तिचा लीनता-प्रेरणेशीं योग्य रीतीनें समन्वय झालेला असतो. ज्या मनांत लीनताप्रेरणा दाबून टाकलेली असते तेथें हा गंड निश्चित उद्भवतो.

**न्यूनगंड** (Inferiority Complex) : स्वत्वप्रेरणेला योग्य वाव न मिळतां ती लीनता-प्रेरणेखालीं दडपून टाकली जाते, तेव्हां न्यूनगंड निर्माण होतो. स्वतःच्या व्यक्तित्वाची छाप बसविण्याच्या सहजप्रवृत्तीला आळा बसला कीं लीनताप्रवृत्ति अधिक जागृत होऊन मनुष्य स्वतःला तुच्छ लेखूं लागतो. अपयश प्राप्त झाल्यानें व जगांतील निरनिराळे दुःखप्रसंग व संकटें अनुभवल्यानें नैसर्गिक लीनताप्रवृत्तीचें आधिक्य ज्याच्या ठायीं आहे असा मनुष्य न्यूनगंडाच्या आहारीं जातो आणि बुद्धि व परिश्रम करण्याची इच्छा असूनहि तो, अपयशाचाच वांटा आपल्याला ठेवलेला आहे असें समजून, प्रयत्नपराङ्मुख होतो. लहान मुलांच्या स्वत्वप्रेरणेला योग्य अवसर दिला नाहीं तर त्यांना या गडांचे दुष्परिणाम भोगावे लागतात.

मार्किस द सेड या उमरावाला दुसऱ्या व्यक्तीला यातना देण्यांत आनंद वाटत असे. त्याच्यावरून (Sadistic complex) **परदुःखानंद-गंड** हें नांव मिळालें. दुसऱ्याला दुःख देण्यांतच ज्या मनुष्याला आनंद होतो त्याच्या मनांत या गंडाचा प्रादुर्भाव होतो. इतर लोकांच्या यातना व क्लेश पाहूनच नव्हे तर त्यांना कारणीभूत होण्यांतच अशा मनुष्याला उत्कट आनंदाचा अनुभव मिळतो. शिक्षक, न्यायाधीश आणि पोलीस यांच्यामध्यें अशा गंडाची छाया असते या विश्लेषणवाद्यांच्या म्हणण्यांत कितपत तथ्य आहे याचा विचार समंजस माणसानें केल्यास त्याला विश्लेषणवादांतील कांहीं ठळक दोषांची कल्पना येईल.

मॅसाक् नांवाचा एक कादंबरीकार मध्ययुरोपांत होऊन गेला. त्या कादंबरीकाराच्या नांवावरून **स्वदुःखानंद-गंड** ( Masochistic complex ) हें नांव मिळालें. त्याच्या कादंबऱ्यांत स्वतःला दुःख अनुभविण्यास लावून त्यांतच आनंद मानणाऱ्या स्त्रीपुरुषांचीं

वर्णनें अतिरंजित रीतीनें केलेली आहेत. कित्येकांना शारीरिक दुःखांतच आनंद होतो आणि ते देहताडन ( flagellation ) करून घेतात. विख्यात फ्रेंच लेखक रूसो याला हा गंड होता असें त्याच्या आत्मचरित्रावरून दिसून येतें. पलायनप्रेरणा व युयुत्सा-प्रवृत्ति यांना योग्य वाव न मिळाल्यानें वर सांगितलेले हे दोन गंड उत्पन्न होतात.

पिग्मॅलिअन या शिल्पकाराची जी कथा ग्रीक पुराणांत आहे, तिला अनुसरून या गंडाला त्या शिल्पकाराचें **प्रतिमागंड** ( Pygmalion complex ) हें नांव देण्यांत आलें. पिग्मॅलिअन यानें एका सुंदर स्त्रीचा पुतळा बनविला आणि त्या पुतळ्यावरच तो प्रीति करूं लागला. त्यानें ॲफ्रोडाईट नामक देवतेला हा पुतळा सजीव करण्याची विनंति केली. जे लोक स्त्रियांच्यावर प्रेम न करितां केवळ त्यांचे पुतळे आणि चित्रें पहाण्यांतच आनंद मानतात त्यांना या गंडाचा उपसर्ग झाला आहे असें समजावें. मूळ प्रकृतीऐवजीं प्रतिमेला महत्त्व देणें म्हणजे मनाची बाह्य सृष्टीशीं संगति नसणें हेंच या गंडांतील आदितत्त्व होय. वर निर्देशिलेल्या गंडांव्यतिरिक्त **प्रदर्शनगंड** ( Exhibitionism ), **अवलोकन गंड** ( Voyeurism ) आणि चिन्हगंड ( Fetishism ) असे गंड असून, मनोविश्लेषणवादी या गंडमालांत अधिकाधिक गंडसुमनें गुंफीतच आहेत.

गंडांचें गंडांतर टाळण्यासाठीं, गंड उत्पन्न झाल्यास त्याचें विसर्जन करणें आवश्यक आहे. ज्या अनिष्टस्थानीं प्रेरणाशक्ति निगडित झालेली असते, तेथून तिचें उच्चाटन करणें म्हणजे 'वियोजन' ( Dissociation ) होय. अशी प्रेरणाशक्ति अनिष्ट स्थानापासून दूर करून तिचें योग्य ठिकाणीं केंद्रीकरण करणें म्हणजे 'संयोजन' ( Re-association ) होय. अशा रीतीनें प्रेरणाशक्तीचें ( Abreaction ) निःसारण झाल्यावर त्या प्रेरणेचें उदात्तीकरण ( Sublimation ) करणें ही तिसरी पायरी. या क्रमानें उपाययोजना केल्यास गंडांचें निराकरण होतें. प्रेरणाशक्तीचा अनिष्ट गोष्टीकडे उपयोग न करितां ती समाजहितासाठीं खर्च केल्यास तिला उच्च स्वरूप प्राप्त होतें आणि यालाच 'उदात्तीकरण' ही संज्ञा आहे. अवलोकनगंड उत्पन्न झाल्यास मनुष्याची जिज्ञासाप्रेरणा भलतीकडेच वाहवत जाते; परंतु या शक्तीला योग्य वळण देऊन तिचा उपयोग सृष्टचमत्कारांच्या निरीक्षणाकडे केल्यास उदात्तीकरण होऊं शकेल. अशा रीतीनें प्रेरणांचें निःसारण व उदात्तीकरण केल्यास गंडांची भीति उरत नाहीं व मनुष्याचें मन पूर्ववत् निरोगी बनतें. मनोविश्लेषण-शास्त्रज्ञांनीं गंडावर उपाययोजना करण्याचे भिन्न भिन्न मार्ग सुचविलेले आहेत. मनोव्यथेचें निदान करणारा शास्त्रज्ञ पीडिताला स्वस्थचित्त होण्यास सांगून निःशंकपणें आपल्या मनांत जे काय विचार येतील ते प्रकट करण्यास सांगतो. मनांत येणारे विचार कितीहि क्षुल्लक किंवा पापी भासले तरी ते निवेदन केलेच पाहिजेत असा या मनोविश्लेषणज्ञ वैद्याचा आग्रह असतो. वैद्य आणि रोगी यांच्यामध्यें तादात्म्यभाव ( rapport ) निर्माण होऊन हळू हळू रोग्याच्या नेणीव - भागांतील विचार व भावना जाणीवेंत आणणें हाच वैद्याचा हेतु असतो. फ्रॉईड याच पद्धतीचा अवलंब करून मनोव्याधिपीडित रोग्याची रोगापासून सुटका करीत असत. त्यापूर्वी फ्रान्समध्यें रोग्याला मोहनिद्राविवश करून त्याचे गुप्तविचार त्याला निवेदन करण्यास लावीत असत. या पद्धतीनें रोगी कांहीं काळ मनोव्याधींतून मुक्त होई. परंतु पूर्वीचींच रोगचिन्हें कालान्तरानें पुनः दृढमूल होत असत. फ्रॉईड यांनीं कांहीं दिवस ही पद्धति अनुसरली पण ती निरुपयोगी आहे हें त्यांच्या निदर्शनास आल्यावर त्यांनीं असें ठरविलें कीं, आपले प्रच्छन्न विचार व भाव रोग्याला स्पष्टपणें कळून आल्याखेरीज तो मनोव्याधींतून कायमचा मुक्त होणें शक्य नाहीं. एतदर्थ रोग्याशीं मोकळेपणानें बोलून त्याच्या नेणीव - मनांतील विचारांचें जाणीवेंत प्रकटीकरण घडवून आणण्याचा त्यांनीं यत्न केला व तो बहुतांशीं सिद्धीसहि गेला असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं.

युंग ( Jung ) हें ॲड्लरप्रमाणेंच फ्रॉईड यांचे शिष्य होते व त्यांनीं सूचक शब्द उपयोजिण्याचा नवीन उपक्रम सुरूं केला. व्याधिग्रस्त रोग्याला कांहीं सूचक शब्द सांगण्यांत येतात व हे शब्द ऐकल्याबरोबर मनांत जी कांहीं कल्पना प्रथम येईल ती रोग्यानें सांगावयाची असते. रोग्यानें सांगितलेल्या कल्पनेला शब्दप्रतिक्रिया ( word-reaction ) असें म्हणतात. सूचक शब्द सांगितल्यावर रोग्यानें दिलेलें प्रत्युत्तर








आणि प्रतिक्रियेला लागणारा वेळ यांची नोंद केली जाते. प्रतिक्रियेला वाजवीपेक्षां अधिक वेळ लागल्यास किंवा प्रत्युत्तर अगदींच चमत्कारिक असल्यास मनोविश्लेषणतज्ज्ञ रोगाचें कारण काय आहे तें समजूं शकतात. आणि त्याप्रमाणें पुढील उपाययोजना सुचवितात. गंडांचें निराकरण करण्यासाठीं वरील कोणत्याहि प्रकारचा अवलंब केला तरी प्रेरणाशक्तीचें निःसारण झाल्याशिवाय रोग्याला गंडमुक्त होतां येत नाहीं.

फ्रॉईड यांनीं मनोविश्लेषण हा नवीनच पंथ मानसशास्त्रांत सुरूं केला असला व शास्त्रीय दृष्ट्या या पंथाचें महत्त्व मानसवेत्त्यांनीं ओळखलें असलें तरी मनोविश्लेषणावर जे अनेकविध आणि सकारण आक्षेप घेतले जातात ते दृष्टीआड करून चालणार नाहीं. फ्रॉईड यांनीं बांधलेला व युंग आणि ॲडलर यांनीं वाढविलेला मनोविश्लेषणाचा डोलारा त्यांच्या चिकित्सक निरीक्षणापेक्षां त्यांच्या दूषित पूर्वग्रहग्रस्त मनोदृष्टीवर आधारलेला आहे. मानसिक रोगाला पायाभूत असणाऱ्या शरीरसंस्थेची विशेष दखलगिरी विश्लेषणवाद्यांनीं घेतली नाहीं. शिवाय, आपले आवडते सिद्धान्त खरे ठरविण्यासाठीं रोग्याच्या प्रतिक्रियेंतून आपल्या तत्त्वांना परिपोषक असलेल्या शब्दांचा आणि कृतींचाच ते स्वीकार करितात. ज्या मानसिक व्यथेचें कारण स्पष्टपणें कळून येण्यासारखें आहे त्या व्यथेची कारणमीमांसा करतांना विश्लेषणवादी नेणीव-मनाचाच आश्रय करतात. सुलभ आकलनासाठीं मनाचे दोन कप्पे मानले असले तरी सर्व मनःशक्ती संमिश्रित असतात ही गोष्ट त्यांच्या ध्यानांत येत नाहीं व आलीच तर आपल्या तत्त्वांच्या चौकटींत बसविण्यासाठीं ते सत्याची ओढाताण करतात. डॉस्ट्रो यांनीं फ्राईडवर असा आरोप केला आहे कीं, मनोवृक्षाचें जें मूळ तेंच मनोविश्लेषणवादी फ्राईड अग्र मानतो ( mistakes Jourminal for the terminal ). एका टीकाकारानें तर मनोरूपी कोठडींत फ्राईड यांना पिशाच्च ( Kobold im keller ) वावरतांना दिसतें असें म्हटलें आहे. प्रत्येक बालकाच्या मनांत पितृगंड व स्वप्रीतिगंड असतील तर मानवी जीविताला मनोव्यथेंतूनच सुरवात होते असें म्हणावें लागेल. समाजहितासाठीं व्यक्तीनें प्रेरणाशक्तींचें नियमन केल्यानें गंड उत्पन्न होतो तर सर्व सामाजिक बंधनें व नीतिनियम झुगारून द्यावयाचे कीं काय ?—यावर न्याय्य बुद्धीनें विचार केल्यास असें मान्य करणें प्राप्त आहे कीं, कांहीं मर्यादेपर्यंत प्रेरणाशक्ती काबूंतच ठेवल्या पाहिजेत. मात्र अतिनियमन केल्यानें होणारा गंडोद्भव टाळला पाहिजे. निरोगी व रोगी मन यांच्यामधील सीमान्तरेषा अनिश्चित असल्यामुळें मनोगंड निर्माण झाला आहे हें कळणें सामान्य माणसाला दुर्घट आहे. अलीकडे युरोप व अमेरिकेंत अनेक स्त्रीपुरुष मनोव्यथांचें निराकरण करण्यासाठीं मानसवैद्याकडे जात असतात. यांपैकीं बऱ्याच जणांच्या तक्रारी क्षुद्र स्वरूपाच्या असतात. विशेषतः वैद्य आणि रोगी यांच्यामध्यें आलेल्या निकट संबंधाचा गैरफायदा घेणारे भोंदू मानसवैद्य स्वतःचा खिसा गरम करीत असतात. स्त्रीरोग्यांच्या बाबतींत तर अनेक अनर्थकारक गोष्टी घडल्याचीं उदाहरणें कांहीं कमी नाहींत. एवंच, आपल्या मनांत कांहींतरी गंड निर्माण झाला आहे अशी गैरसमजूत करून घेतल्यानें पुष्कळ स्त्रीपुरुषांच्या मनांत 'गंडस्योपरि पिटिका संवृत्ता' या न्यायानें गंडोद्भव गंड हा एक नवीनच अनर्थकारक गंड निर्माण झाल्याचीं चिन्हें दिसत असल्यामुळें या गंडाचें गंडस्थळ फोडून टाकणें हेंच उचित ठरेल !

---

## चोरी

**स्वतःच्या दारिद्र्याला कंटाळून**
**रात्रीच्या काळोखांत**
**तो चोरी करायला म्हणून**
**बाहेर पडला.**
**शहराच्या सर्व भागांतून**
**तो फिर फिर फिरला.**
**पण जिथें पहावें तिथें**
**कडया-कुलुपें घालून**
**दाराआड लोक नुसते**
**चोरासारखे लपून बसलेले**
**त्याला आढळले !**

**—राजा मंगळवेढेकर**



अनुक्रमणिका








आंतरराष्ट्रीय राजकारणांतील एक समस्या : श्री. व. भ. क र्णि क

# जर्मनीचा प्रश्न

जर्मनीचा प्रश्न हा आजच्या आंतरराष्ट्रीय राजकारणांतील अत्यंत महत्त्वाचा आणि अत्यंत नाजूक असा प्रश्न आहे. युरोपचें भवितव्य, एवढेंच नव्हे तर जागतिक शांततेचें भवितव्य हा प्रश्न नीट रीतीनें सुटण्यावरच अवलंबून आहे. हा प्रश्न सोडविण्याचे आतांपर्यंत पुष्कळ प्रयत्न झाले, पण एका बाजूला रशिया आणि दुसऱ्या बाजूला अमेरिका, ब्रिटन व फ्रान्स यांच्यामध्यें एकमत न झाल्याकारणानें ते सारे अयशस्वी ठरले.

महायुद्ध जिंकल्यामुळें जर्मनीचें भवितव्य ठरविण्याचा अधिकार अमेरिका, ब्रिटन, फ्रान्स व रशिया हीं जीं चार विजेती राष्ट्रें त्यांना प्राप्त झाला आहे. या चार राष्ट्रांमध्यें एकी असती तर तें भवितव्य तावडतोब ठरलें असतें आणि तहनामा होऊन जर्मनीला स्वतंत्र राष्ट्राचा दर्जा कधींच मिळाला असता. पण युद्ध लढत असतांना त्या चार राष्ट्रांमध्यें जें एकमत व एकभावना होती ती युद्धानंतर टिकली नाही आणि त्यामुळें युद्ध संपून आठ वर्षें उलटून गेलीं तरी जर्मनीचा प्रश्न तसाच चिघळत पडला आहे.

आज जर्मनीचे दोन तुकडे झालेले आहेत. एक तुकडा रशियाच्या सार्वभौमत्वाखालीं आहे, तर दुसरा तुकडा अमेरिका, ब्रिटन व फ्रान्स यांना अंकित आहे. युद्धाच्या शेवटीं देशाचे चार तुकडे झालेले होते व एकेक तुकडा एकेका देशाच्या अंमलाखालीं होता. ही विभागणी तात्पुरत्या स्वरूपाची होती व ती शक्य तितक्या लवकर रद्द करून देशाचें एकीकरण करावयाचें अशी त्यावेळी भावना होती. पण रशिया व अमेरिका यांच्यांमधील भांडण जसें वाढत गेलें तशी ती भावना लोपत गेली आणि अखेर एकीकरण झालें तें फक्त अमेरिका, ब्रिटन व फ्रान्स यांच्या अंमलाखालील तुकड्यांचें. रशियन अंमलाखालील तुकडा अलग राहिला आणि देश कायमचा दुभंगला गेला.

जर्मनीचे हे दोन तुकडे आज दोन वेगळीं राष्ट्रें म्हणून नांदत आहेत. रशियन अंमलाखालील पूर्व-जर्मनीची वाढ परंपरागत रशियन पद्धतीप्रमाणें होत असून, नांवाला जरी तें वेगळें राष्ट्र म्हणून नांदत असलें तरी त्याचे सारे व्यवहार आणि धोरणें रशिया-मार्फतीनेंच ठरवलीं जातात. अमेरिका, ब्रिटन व फ्रान्स यांच्या अंमलाखालील भागांत पश्चिम जर्मनीचें प्रजा-सत्ताक राज्य स्थापन झालें आहे. या राज्याची राजधानी बॉन येथें असून या राज्याला आता सार्वभौम राज्याचे बहुतेक अधिकार प्राप्त झाले आहेत. गेल्या तीनचार वर्षांत या राज्यानें मोठीच प्रगति केली असून त्याची आर्थिक भरभराट सध्या खूप झपाट्यानें चालू आहे. पूर्वजर्मनी रशियन गोटांत सामील आहे तर पश्चिम जर्मनी लोकशाहीवादी राष्ट्रांच्या गटांत सामील आहे.

जर्मनीची तूर्त ही अशी विभागणी झाली आहे. पण त्या विभागणीनें जर्मनीचा प्रश्न सुटलेला नाहीं. एक तर जर्मनीमध्यें एकीकरणाची भावना अत्यंत प्रबळ आहे. दोन्ही भागांमध्यें राहणाऱ्या जर्मन लोकांना, आपण एकत्र यावें आणि पूर्वीसारखें आपलें एकसंध राष्ट्र बनावें, असें वाटतें. सध्याची जर्मनीची विभागणी ही अत्यंत कृत्रिम स्वरूपाची आहे. तिनें दोन्ही भागांचें नुकसान झालें आहे. शिवाय विजयी राष्ट्रांनीं ती आपल्यावर जुलमानें लादली आहे याचीहि त्यांना कल्पना असल्याकारणानें ती शक्य तितक्या लवकर रद्द व्हावी अशी सर्व जर्मनांची एकमुखी मागणी आहे. रशिया असो अगर अमेरिका असो, दोघांनाहि या मागणीला विरोध करणें शक्य नाहीं. जो कोणी या मागणीला विरोध करील त्याला जर्मनीमध्यें मुळींच पाठिंबा लाभणार नाहीं. शिवाय जोंवर विभागणी आहे तोंवर परकीय फौजा आपल्या देशांतून हलणार नाहींत, हें देखील जर्मन जनतेला माहीत आहे. त्यामुळें परकीय फौजांबद्दल तिला जितकी चीड वाटते तितकीच देशाचे तुकडे झाल्याबद्दल वाटते. जर्मन जनतेच्या या








मन:स्थितीकडे फार दिवस दुर्लक्ष करणें रशिया अगर अमेरिका या दोघांनाहि शक्य होणार नाहीं.

जर्मनीचें एकीकरण करावयाचें, पण तें कसें हा मोठाच कूटप्रश्न आहे. रशियाची सूचना अशी कीं आजचें पूर्वजर्मनीचें सरकार व पश्चिम जर्मनीचें सरकार यांनीं आपआपसांत बोलणीं करून एक तात्पुरतें सरकार बनवावें, व त्या सरकारनें नंतर निवडणुका घडवून आणून कायमचें सरकार बनवावें. या सूचनेमध्यें अनेक दोष आहेत. मुख्य दोष हा कीं पश्चिम जर्मनींतील सरकार जसें खुल्या निवडणुका होऊन बनलेलें आहे, तसें पूर्वजर्मनीतील सरकार बनलेलें नाहीं. पूर्वजर्मनींतील सरकार हें रशियन अधिकाऱ्यांनीं आणि त्यांच्या प्रेरणेनें चालणाऱ्या सोशॅलिस्ट युनिटी पार्टी या नांवाच्या कम्युनिस्ट पक्षानें जनतेवर लादलेलें सरकार आहे. म्हणून दोन सरकारांमध्यें वाटाघाटी होण्यापूर्वी पूर्वजर्मनीमध्यें खुल्या निवडणुका व्हायला हव्यात. एकीकरणापूर्वी देशभर खुल्या निवडणुका होतील अशी तजवीज करण्यासाठीं व त्याप्रमाणें खुल्या निवडणुका घडवून आणण्यासाठीं एक आंतरराष्ट्रीय निरीक्षकमंडळ नेमलें पाहिजे अशी अमेरिकन गटाची याला उपसूचना आहे. पण रशियाला ती पसंत नाहीं. रशियाची सूचना मान्य केली तर पूर्वयुरोपमधील देशांत जें घडलें त्याचीच पुनरावृत्ति जर्मनीमध्येंहि होईल अशी सर्वांनाच धास्ती वाटते. त्यामुळ इंग्लंड-अमेरिकेमध्यें तर राहोच, पण पश्चिम जर्मनीमध्येंहि रशियाच्या या सूचनेला कुणाचाहि पाठिंबा लाभत नाहीं.

एकीकरण कसें करावयाचें याच्याहिपेक्षां एकत्रित झालेल्या जर्मनीचें स्थान व भूमिका कोणती याविषयीं सर्व बड्या राष्ट्रांमध्यें जास्त तीव्र व मूलगामी स्वरूपाचे मतभेद आहेत. जर्मनीची एकजूट झाली व तहनामा होऊन जर्मनीला स्वतंत्र व सार्वभौम राष्ट्राचा दर्जा प्राप्त झाला कीं पुढें काय याविषयीं सर्वांनाच चिंता वाटते. जर्मनी हें युरोपमधील एक पहिल्या दर्जाचें राष्ट्र आहे. जर्मन लोकांची उद्योगपरायणता आणि त्यांचे तंत्रविषयक कौशल्य जगभर प्रसिद्ध आहे. त्यांच्या लष्करी सामर्थ्याचाहि साऱ्या जगाला दरारा वाटतो. असें हें राष्ट्र स्वतंत्र झालें कीं शांततावृत्तीनें नांदेल कीं पुन्हा परत जुन्या वळणावर जाऊन लष्करी पेशा पतकरील ? स्वतंत्र झाल्यानंतर जर्मनीमध्यें लष्करी वृत्तीची वाढ होऊं नये व तिचें लष्करी सामर्थ्य भरमसाट वाढूं नये याविषयीं कोणती उपाययोजना करतां येईल ? जगामध्यें आज जे दोन विरोधी राष्ट्रांचे गट आहेत त्यांचे जर्मनीला आपल्या बाजूला वळविण्याचे जे प्रयत्न होतील त्यांना आळा कसा घालतां येईल ? दोन वेळां जर्मन लष्करी सामर्थ्याची शिकार बनल्याकारणानें ज्यांची वाताहत झाली त्या युरोपमधील राष्ट्रांना जर्मनीविरुद्ध अभयदान कसें देतां येईल ? जर्मनीमध्यें लोकशाहीची वाढ होईल आणि हुकूमशाही व लष्करशाहीचें पुनरुज्जीवन होणार नाहीं यासाठीं कोणते उपाय योजावे ? – हे व अशाच तऱ्हेचे अनेक प्रश्न चारहि बडी राष्ट्रें व युरोपमधील इतर राष्ट्रें यांच्यापुढें उत्पन्न झाले आहेत. या प्रश्नांचीं उत्तरें ते एकमतानें देऊं शकत नाहींत. म्हणूनच जर्मनीचा प्रश्न अद्याप सुटत नाहीं.

रशियन गट व अमेरिका आदिकरून राष्ट्रांचा गट यांच्यामध्यें भांडण उद्भवलें नसतें तर जर्मनीचा प्रश्न एवढा किचकट बनला नसता. एका विचारानें दोघांनाहि जर्मनीशी तह घडवून आणतां आला असता आणि तहामध्यें अटी घालून लोकशाही वाढेल, लष्करशाहीचा निःपात होईल, लष्करी सामथ्य व उद्योगधंदे वाढणार नाहींत व परराष्ट्रांना जर्मनीचा पुन्हा उपद्रव होणार नाहीं, अशा तऱ्हेची खात्रीलायक योजना आंखतां आली असती. यांतच जर्मनीचें, युरोपचें आणि जगाचेंहि हित होतें. दुर्दैवानें आंतरराष्ट्रीय परिस्थितीला वेगळी कलाटणी मिळाली. युद्धकालीन दोस्तांमध्यें वैमनस्य उत्पन्न झालें आणि जेथें दोन्ही गटांचे हितसंबंध गुंतले आहेत असा कोणताहि प्रश्न सुटणें मुष्किलीचें झालें.

आज जर्मनीच्या बाबतींत दोन्हीहि राष्ट्रगटांच्या ज्या हालचाली होत आहेत त्या केवळ स्वतःच्या हितावर नजर ठेवून. स्वतःची बाजू बळकट करण्याच्या व दुसऱ्याची बाजू कमजोर करण्याच्या दृष्टीनेंच दोघांचेहि डावपेंच चालले आहेत. हे डावपेंच खेळतांना दोघांनींहि भल्याबुऱ्याबद्दलचे विचार गुंडाळून ठेवले आहेत. या बाबतींत अमेरिकन, ब्रिटिश अगर फ्रेंच सेनाधिकाऱ्यांनीं युद्धकैद्यांना सोडून दिलें, जुन्या नाझी राजवटींतील लोकांना जवळ केलें, मोठ्या कारखानदारांना उत्तेजन दिलें, लष्करी वृत्ति वाढूं दिली अशा तऱ्हेचे








बरेच प्रवाद आपल्याइकडे ऐकूं येतात. पण खरी गोष्ट अशी आहे की जवळ जवळ याच तऱ्हेच्या सर्व गोष्टी रशियन सेनाधिकाऱ्यांनींहि आपल्या हद्दींत केल्या आहेत. आपल्या अमलांखालील प्रदेशाच्या लष्करीकरणाच्या बाबतींत तर त्यांनीं अमेरिकन अगर ब्रिटिश अधिकाऱ्यांवरहि कडी केली आहे असें म्हणतां येईल. पश्चिम जर्मनीमध्यें प्रातिनिधिक स्वरूपाची राज्यपद्धति आहे व नागरिक हक्क आहेत, त्यामुळें पुष्कळ गोष्टी तिथें करतां येत नाहींत व केल्या तर जगभर गवगवा होतो. पूर्वजर्मनीमध्यें तें बंधन नसल्याकारणानें तिथें स्वतःचा बालेकिल्ला उभारण्याचा रशियाचा उद्योग जास्त मोठ्या प्रमाणावर चालू आहे.

रशियाला जर्मनीची धास्ती वाटते ती अत्यंत साहजिक आहे. गेल्या महायुद्धांत रशियाच्या अगदीं प्राणावर बेतलें होतें. त्या वेळीं जर्मनीला दोन्ही बाजूंनीं लढावें लागलें नसतें व रशियाला ब्रिटन व अमेरिका यांची मदत न होती तर हिट्लरी सैन्यापुढें टिकाव धरणें रशियाला फारच कठीण गेलें असतें. महायुद्धामध्यें घडलेलें नुकसान व जर्मन सैनिकांनीं केलेले अत्याचार यांची आठवण रशिया विसरणें शक्य नाहीं. त्या प्रकारांची पुनरावृत्ति होऊं नये अशी त्याची इच्छा असणें साहजिक आहे. आणि या बाबतींत कुणाच्याहि मर्जीवर अगर मोहबतीवर अवलंबून राहण्याची रशियाची तयारी नाहीं. त्याला या बाबतींत निखालस स्वरूपाची आणि अचूक परिणामाची अशी योजना हवी. रशियाच्या या मागणीला पोलंड, झेकोस्लोव्हेकिया, हंगेरी, रुमेनिया इत्यादि सोव्हिएट-अंकित राष्ट्रांचाहि पाठिंबा आहे. कारण त्या राष्ट्रांनाहि जर्मन लष्करशाहीचा अनुभव आहे. त्या अनुभवाची पुनरावृत्ति होऊं देण्याची त्यांची देखील तयारी नाहीं.

दुसऱ्याहि एका कारणामुळें या सर्व राष्ट्रांना जर्मनीच्या पुनरुत्थानाची धास्ती वाटते. तें कारण हें कीं पूर्वींचे कांहीं जर्मन मुलुख यांच्यापैकी कांहीं राष्ट्रांनी खाल्ले आहेत. महायुद्धांतील पराजयानंतर जर्मनीचे अनेक लचके तोडले गेले. ईशान्येकडील कांहीं भाग रशियानें गिळंकृत केला. पूर्वेकडील बराचसा भाग पोलंडनें घेतला आणि जर्मनीची पूर्व सरहद्द ओडरपर्यंत मागें सरकली. दक्षिणेकडे सुडेटन प्रांताला जर्मनीला मुकावें लागलें. या सर्व प्रदेशांतून स्थानिक जर्मनांची हकालपट्टी झाली. निर्वासित बनून त्यांना उरलेल्या जर्मनीमध्यें जावें लागलें. या निर्वासितांची संख्या खूप मोठी आहे. ते अद्याप देखील आशाळभूतपणानें आपल्या जुन्या वसतिस्थानाकडे पहात आहेत. आपली जुनी मालमत्ता परत मिळावी अशी त्यांची सतत खटपट चालू आहे. म्हणून जर्मनीच्या आजच्या सीमा बदलण्याचे प्रयत्न होतील अशी रशिया–आदिकरून पूर्व युरोपमधील राष्ट्रांना धास्ती वाटते. जर्मनी परतंत्र व निःशस्त्र आहे तोंवर या प्रयत्नांनीं कुणाचेंहि वांकडें होणार नाहीं. पण उद्या जर्मनी स्वतंत्र झाला व स्वतंत्र झाल्यानंतर त्याचें लष्करी सामर्थ्य वाढलें कीं ते प्रयत्न कोणच्या थरावर जातील आणि कोणतें स्वरूप प्राप्त होईल कुणी सांगावें ? म्हणून जर्मनी स्वतंत्र होण्यापूर्वींच जर्मनीच्या पूर्वेकडील सीमा सर्वानुमतें ठरल्या पाहिजेत व त्या सीमा अबाधित राहतील अशी हमी सर्वांकडून मिळाली पाहिजे असा रशियाचा आग्रह आहे. स्वतंत्र व सार्वभौम जर्मनीबद्दल जी धास्ती वाटते तीच या आग्रहाच्या मुळाशीं आहे.

रशिया-आदिकरून पूर्व युरोपमधील राष्ट्रांना जशी जर्मनीची धास्ती वाटते तशीच फ्रान्स-आदिकरून पश्चिम युरोपमधील राष्ट्रांना वाटते. जर्मन लष्करशाहीचे प्रताप त्यांनींहि अनुभवलेले आहेत. जर्मन सेनांनीं केलेली आपल्या प्रदेशाची व जनतेची धूळधाण त्यांनींहि पाहिलेली आहे. जर्मन हुकूमशाहीचा वरवंटा त्यांच्याहि मस्तकावरून फिरलेला आहे. म्हणून जर्मनीच्या पुनरुत्थानाचा विचार करतांना त्यांच्याहि जीवाचा थरकांप होतो. त्यांनाहि असें वाटतें कीं जर्मनीवर नियंत्रणें हवीं, निदान जर्मनीचें लष्करी सामर्थ्य भरमसाट वाढणार नाहीं व लष्करी वृत्तीच्या लोकांच्या हातीं देशांतील राज्यसत्ता जाणार नाहीं अशी खबरदारी घ्यावयास हवी. ही खबरदारी कशी घ्यावयाची याबद्दल मात्र त्यांच्यामध्यें एकमत नाहीं.

एकट्या जर्मनीचीच धास्ती त्यांच्या डोळ्यापुढें उभी असती तर ती अडचण सहज सोडवितां आली असती. पण जर्मनीपेक्षांहि त्यांना आज रशियाची जास्त धास्ती वाटत आहे. जर्मनीबद्दलची धास्ती भविष्यकाळाबद्दलची आहे. रशियाबद्दलची धास्ती आजची, या घटकेची आहे. जर्मनी आज निःशस्त्र आहे, तिच्याजवळ आज फौजा नाहींत. उलट रशिया लष्करी








दृष्टीनें आज अत्यंत सुसज्ज अशा स्थितींत आहे. रशियाचें सेनाबल इतकें अजस्र आहे कीं त्यापुढें फ्रान्स-आदिकरून राष्ट्रांना चारदोन दिवस देखील टिकाव धरणें शक्य नाहीं. म्हणून पश्चिम युरोपमधील या राष्ट्रांना जर्मनीपेक्षांहि रशियाची आज जास्त धास्ती वाटते. तिसऱ्या महायुद्धाचे वारे सुरू झाल्यापासून तर ही धास्ती त्यांना जास्त प्रमाणांत वाटूं लागली आहे. आज अमेरिका व ब्रिटन यांच्या सेना युरोपमध्यें ठाण देऊन बसल्या आहेत म्हणून त्यांना थोडी तरी सुरक्षितता वाटते. पण ही सुरक्षितता अपुरी आहे. रशियाच्या लष्करी सामर्थ्याच्या तोडीचें लष्करी सामर्थ्य निर्माण केल्याखेरीज त्यांना आपण पुरतें सुरक्षित आहों असें वाटणें शक्य नाहीं. अमेरिका व ब्रिटन यांच्या मदतीनेंच त्यांना तें शक्य आहे. तसेंच मिळाली तर त्यांना या बाबतींत जर्मनीचीहि मदत हवी आहे.

म्हणूनच जर्मनीबद्दल धास्ती वाटत असली तरी देखील जर्मनीचें लष्करी सामर्थ्य एका विवक्षित प्रमाणांत व विवक्षित स्वरूपांत वाढावें असें अमेरिका, ब्रिटन, फ्रान्स आदिकरून राष्ट्रांना वाटत आहे. यांतूनच युरोपिअन सेनेची कल्पना निघाली. युरोपच्या संरक्षणासाठीं एकविचाराच्या अशा पश्चिम युरोपमधील राष्ट्रांची एक संयुक्त सेना असावी अशी ती कल्पना आहे. जर्मनीचें सैन्यबल वाढवायाचें तें स्वतंत्रपणें न वाढतां त्या युरोपिअन सेनेचें एक अधिकृत अंग या नात्यानें वाढावें असा त्या योजनेचा एक भाग आहे. ही योजना मान्य झाल्यास जर्मन लष्कराची मदत तर लाभेल, पण तें वरचढ होईल व शेजारच्या राष्ट्रांना उपद्रव देऊं लागेल हा जो धोका आहे तो देखील टळेल अशी अपेक्षा आहे.

अमेरिकन मुत्सद्यांनीं युरोपिअन सेना व युरोपिअन –संरक्षण–समाज (European Defence Community) यांच्या या कल्पना काढल्या. अॅट्लँटिक कराराप्रमाणें जी संरक्षणयोजना आंखण्यांत आली तिचें क्षेत्र वाढवून व पश्चिम जर्मनीचें सहकार्य मिळवून रशियाच्या संभाव्य आक्रमणाविरुद्ध ही जास्त परिणामकारक अशी संरक्षक फळी उभारण्याचा त्यांचा मानस आहे. ही योजना कागदावर आंखण्यांत आली आहे खरी, पण तिची अंमलबजावणी करणें फार कठीण जात आहे. योजना अंमलांत येण्यापूर्वी संबंधित राष्ट्रांच्या कायदेमंडळांची तिला संमति मिळावयास हवी. संबंधित राष्ट्रांमध्यें फरान्सचें अग्रस्थान आहे. फरान्सचें मत या योजनेबद्दल द्विधा आहे. फरान्सला एका क्षणाला असें वाटतें कीं युरोपिअन सेना उभारली गेली तर तिसरें महायुद्ध टळेल आणि आपल्याला शांतता व सुरक्षितता लाभेल. पण दुसऱ्याच क्षणीं त्याला असें वाटतें कीं, युरोपिअन सेनेमध्यें देखील जर्मनांचेंच प्राबल्य होईल आणि युरोपियन सेनेच्या नांवानें वाढविलेलें लष्करी सामर्थ्य उद्यां जर्मनी कदाचित् आपल्यावरच उलटवील. या द्विधा मनःस्थितीमुळें फ्रान्सची अद्याप या योजनेला संपूर्ण संमति लाभलेली नाहीं.

जर्मनीमध्येंहि या योजनेबद्दल एकमत नाहीं. एक विचार असा आहे कीं ‘ युद्धें आपण पुष्कळ खेळलों, आतां कुणासाठींहि का होईना पण आपल्याला युद्ध नको, आपण आपल्या हद्दींत शांततेनें रहावें हाच उत्तम मार्ग ’ दुसरा विचार असा आहे कीं “ आज रशियाशीं आपलें भांडण नाहीं. पश्चिम युरोपच्या संरक्षणाची जबाबदारी पतकरून रशियाचा राग निष्कारण आपण आपल्यावर कां ओढवून घ्यावा ? ज्यांना युद्ध लढायचें असेल त्यांनीं खुशाल लढावें. आम्हांला मात्र त्यांनीं त्यांत गोवूं नये, आम्हांला बाजूला ठेवून अमेरिका, ब्रिटन, फ्रान्स आदिकरून राष्ट्रांना जे कांहीं करावयाचें असेल तें त्यांनीं खुशाल करावें, आम्ही त्यांत भाग घेणार नाहीं”. या विचारसरणीचें प्रतीक असा ‘ओन्हे माइक्’ ( ohne mich ) म्हणजे ‘ आम्हांला वगळून’ हा शब्दप्रयोग जर्मनीमध्यें खूप प्रचलित आहे. तिसरा एक विचार जो प्रचलित आहे तो असा कीं, “ जर तुम्हांला आमची मदत हवी असेल तर अगोदर आमचा देश आज जो दुभंगलेला आहे त्याचें एकीकरण करा, आमच्या राष्ट्राचें स्वातंत्र्य व सार्वभौमत्व मान्य करा. आम्हांला बरोबरीचा दर्जा द्या, मग आम्ही मोठ्या आनंदानें तुमच्या सैन्यांत भाग घेऊं व तुमच्या बरोबरीनें युरोपच्या संरक्षणासाठीं लढूं. ” अशाच तऱ्हेचे अनेक विचार जर्मनीमध्यें सध्यां प्रचलित आहेत. या सर्वांमध्यें हल्लीं प्रभावी ठरत असलेला विचार हा आहे कीं “अमेरिकेशीं अगर पश्चिम युरोपशीं आपलीं भांडणें असलीं तरी तीं गौण स्वरूपाचीं आहेत आणि अखेरीस त्यांच्याशींच आपलें सांस्कृतिक दृष्ट्या








जास्त जवळचें नातें आहे. म्हणून मिळत असलेल्या संधीचा आपण तूर्त फायदा घ्यावा आणि त्या संधीचा उपयोग करूनच आपल्याला ज एकीकरण आणि स्वातंत्र्य हवें आहे तें प्राप्त करून घेतां येईल." सप्टेंबर-मध्यें झालेल्या सार्वत्रिक निवडणूकीमध्यें चॅन्सेलर अँडेनॉर यांना जें घसघसीत यश मिळालें तें या विचार-सरणीच्या वाढत्या लोकप्रियतेचें द्योतक आहे. जुन्या लष्करी पेशांतील बरीच मंडळी या विचारसरणीच्या पाठीशीं आहेत. त्यामुळें ही विचारसरणी प्रभावी ठरली तर त्या मंडळींचें समाजामध्यें व राजकारणामध्यें वर्चस्व वाढण्याची धास्ती आहे ही गोष्ट या ठिकाणीं नमूद करावयास हवी.

रशियाचा तर या योजनेला संपूर्णतया विरोध आहे. ॲट्लँटिक करार व त्या करारान्वयें उभारण्यांत आलेली यंत्रणा संरक्षक स्वरूपाची नसून आक्रमक स्वरूपाची आहे असा रशियाचा पहिल्यापासूनच आक्षेप आहे. त्या योजनेमध्यें जर्मनीच्या लष्करी सामर्थ्याची भर पडली कीं आपल्या उरावर पिस्तुल उगारल्यासारखेंच होईल, अशी रशियाला धास्ती वाटते. म्हणून जर्मनीचें लष्करी सामर्थ्य वाढावें या गोष्टीलाच मुळीं रशियाचा विरोध आहे. लष्करी सामर्थ्य वाढलें कीं जर्मनी पूर्वयुरोप-मधील देशांना व आपल्याला देखील उपद्रव दिल्या-वांचून राहणार नाहीं अशी रशियाला धास्ती वाटते. शिवाय त्याला अशीहि धास्ती वाटते कीं अमेरिका या लष्करी सामर्थ्याचा आपल्याविरुद्ध उपयोग करील. रशियाला जर्मनीची जेवढी धास्ती वाटते तवढी दुसरी कुणाचीहि वाटत नाहीं. ही धास्ती कायमची नाहींशी झाली पाहिजे, असा रशियाचा आग्रह आहे. जर्मनीकडून पुन्हां उपद्रव पोंचणार नाहीं अशी खात्री पटल्याखेरीज रशिया जर्मनीच्या प्रश्नाचा विचार करण्यासाठीं एकत्र बसायला देखील तयार नाहीं.

अमेरिका, ब्रिटन व फ्रान्स यांनीं जर्मनीच्या प्रश्नाचा विचार करण्यासाठीं या महिन्यांत लुगानो येथें परराष्ट्रमंत्र्यांची परिषद् भरवावी अशी जी सूचना केली होती तिला रशियानें नकार दिला याच्या पाठी-मागें हीच वृत्ति आह. परिषद् भरविण्यापूर्वींच ॲट्लँटिक कराराची यंत्रणा व युरोपिअन सैन्याची योजना अमेरिका, ब्रिटन व फ्रान्स यांनीं रद्द करावी अशी अट रशियानें घातली. रशियाचें हें कृत्य योग्य आहे असें कुणालाहि म्हणतां येणार नाहीं. रशियाच्या नकारामुळें परिषद् भरणें आतां अशक्य झालें आहे. त्यामुळें जर्मनीचा प्रश्न पुन्हां तसाच लोंबकळत पडला आहे. परिषदेला हजर राहून जर्मनीच्या प्रश्नाचा कायमचा निकाल लावण्याच्या तयारीनें रशियानें या सूचना केल्या असत्या तर त्यांचा जास्त चांगल्या तऱ्हेनें विचार झाला असता व त्याला पुष्कळ अंशीं मान्यता देखील मिळाली असती. रशियाला जशी सुसज्ज जर्मनीची धास्ती वाटते, तशी फ्रान्स आदिकरून पश्चिम युरोपियन राष्ट्रांनाहि वाटते, ही गोष्ट रशियानें विसरण्याचें कारण नव्हतें. ही गोष्ट लक्षांत ठेवून रशियानें आपले पवित्रे टाकले असते तर रशियाचा कार्यभागहि साधला असता आणि जर्मनीचा प्रश्नहि सुटला असता.

रशियाच्या आडमुठेपणामुळें आज तरी जर्मनीबद्दलची परिषद् भरणें अशक्य झालें आहे. अशी परिषद् भरून दोन्ही राष्ट्रगटांच्या संमतीनें जर्मनीचा प्रश्न जोंवर सुटत नाहीं तोंवर दोन्ही गटांनीं आपआपल्या पक्षाच्या मजबुतीसाठीं त्या देशांत वेगवेगळया तऱ्हेचे डावपेंच खेळावे हें साहजिकच आहे. असे डावपेंच खेळणें योग्य नव्हे हें खरें. पण ते दोन्हीहि गट खेळत आहेत ही गोष्ट नजरेआड करून कसें भागेल ? आणि दोन गटांमधील या भांडणानें फायदा होत आहे जर्मनी-मधील प्रतिगामी शक्तींचा. जर्मनीमध्यें अद्याप देखील जुन्या नाझी राजवटीचे पुरस्कर्ते, लष्करशाहीचा अभिमान बाळगणारे व जहाल राष्ट्रवादी वृत्तीचे अनेक गट अस्तित्वांत आहेत. त्यांचें या भांडणामुळें फावतें. आज या तर उद्यां त्या राष्ट्रगटाची मदत मिळवून त्यांना आपलें देशांतील वजन वाढवितां येतें. हा प्रकार सध्यां चालू आहे. त्यामुळें युद्धोत्तर जर्मनीची वाढ लोकशाहीच्या दिशेनें व्हावी ही जी दोन्ही राष्ट्रगटांची इच्छा ती फलद्रूप होणें दिवसेंदिवस जास्त कठीण होत चाललें आहे. म्हणून जर्मन जनतेच्या हिताच्या दृष्टीनें, एवढच नव्हे तर युरोपच्या सुरक्षिततेच्या व जागतिक शांततच्या दृष्टीनेंहीं हें भांडण शक्य तितक्या लवकर मिटणें फार अवश्यक आहे.

अमेरिका, ब्रिटन व फ्रान्स यांना जर्मनीचें लष्करी सामर्थ्य वाढवायचें आहे असा आक्षेप रशियाकडून








नेहमी घेतला जातो. पण त्या तीन राष्ट्रांच्या मनामध्यें ती दुष्ट इच्छा कां उत्पन्न होते याचा रशियानें जरा विचार करण्यासारखा आहे. रशियाच्या शांततावृत्ती-बद्दल खात्री नाहीं व त्याच्या अजस्र लष्करी सामर्थ्याची धास्ती वाटते म्हणूनच स्वसंरक्षणासाठीं म्हणून पश्चिम युरोपिअन राष्ट्रांना जर्मनीकडे पहावें लागत आहे. आक्रमक धोरण स्वीकारणार नाहीं अशी रशियानें खात्री पटविली व सेनाबल कमी करण्याचें धोरण स्वीकारलें तर संरक्षणासाठीं जर्मनीच्या तोंडाकडे पाहण्याचें त्या राष्ट्रांना कारण उरणार नाहीं. महायुद्धाच्या अंतानंतर लष्करी तयारीला सुरुवात प्रथम कुणी केली, रशियानें कीं अमेरिकेनें, या वादांत या क्षणीं पडण्याचें कारण नाहीं. त्या वादामध्यें कुणाचें कांहींहि मत असलें तरी जर्मनीचें लष्करी सामर्थ्य वाढविण्याचा मोह अमेरिका – आदिकरून राष्ट्रांना जो पडतो तो रशियाच्या धास्तीमुळें, ही गोष्ट नाकारण्यांत हंशील नाहीं. म्हणून आपल्याविषयीं इतरांना वाटणारी ही धास्ती कमी करण्याचे प्रयत्न रशियाकडून होणें अगत्याचें आहे. रशियानें त्या धर्तीचे प्रयत्न केले तर जर्मनीचा प्रश्न सुटण्याच्या मार्गातील एक मोठीच धोंड दूर होईल.

रशियानें जसें हें करावयास हवें तसेंच अमेरिका, ब्रिटन व फ्रान्स यांनीं रशियाला जी जर्मनीची धास्ती वाटते ती दूर करण्याच्या दृष्टीनें कांहीं उपाय योजावयास हवेत. स्वतंत्र जर्मनी पूर्वेकडील आपले जुने मुलुख मिळविण्याचे प्रयत्न करील व त्यासाठीं वेळ-प्रसंगीं युद्धाचाहि मार्ग पतकरील अशी रशिया, पोलंड, झेकोस्लोव्हेकिया आदिकरून राष्ट्रांना धास्ती वाटते. या बाबतींत अमेरिका, ब्रिटन व फ्रान्स यांनीं त्या राष्ट्रांना अभयवचन द्यावयास हवें. एकदां मान्य झालेल्या सरहद्दी बदलण्याचा जर्मनी प्रयत्न करणार नाहीं व यदाकदाचित् तसा प्रयत्न झाला तर त्याचा सामुदायिक प्रतिकार होईल अशी हमी रशिया – आदिकरून राष्ट्रांना मिळावयास हवी. ब्रिटनचे पंतप्रधान सर विन्स्टन चर्चिल यांना या गोष्टीची जाणीव आहे. म्हणून कांहीं महिन्यांपूर्वी केलेल्या पर-राष्ट्रीय प्रश्नावरील आपल्या महत्त्वाच्या भाषणांत त्यांनीं जुन्या लोकार्नो कराराचा उल्लेख केला होता व तशाच तऱ्हेचा एखादा नवीन करार करून रशिया व पूर्व युरोपमधील इतर राष्ट्रें यांचें समाधान करावें लागेल असें त्यांनीं ध्वनित केलें होतें. अमेरिका – आदिकरून राष्ट्रांनीं आतां या गोष्टीचा जास्त खुलासेवार विचार केला पाहिजे आणि रशियाची ही अडचण दूर करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. ती अडचण दूर झाली तर रशिया जर्मनीच्या प्रश्नाचा जास्त निर्धास्त मनानें विचार करूं शकेल आणि मग तो प्रश्न सोडविणें फारसें कठीण जाणार नाहीं.

आतांपर्यंतच्या विवेचनावरून हें उघड होईल कीं रशियन गट व अमेरिका – आदिकरून राष्ट्रांचा गट यांच्या धोरणांत महत्त्वाचे फेरबदल घडून आल्या-खेरीज जर्मनीचा प्रश्न सुटणें शक्य नाहीं. केवळ परराष्ट्र-मंत्र्यांच्या बैठकीनें हे बदल घडून येणें शक्य नाहीं. त्यासाठीं राष्ट्रांचीं सूत्रें ज्यांच्या हातीं आहेत अशा राष्ट्र-प्रमुखांच्या भेटीगांठीं होणेंच अत्यावश्यक आहे. सर विन्स्टन चार्चिल यांनीं ही सूचना गेल्या मे महिन्यांत केली होती. अमेरिकेला ती सूचना पसंत पडली नाहीं म्हणून ती गुलदस्तांत राहिली. आतां रशियानेंहि तिच्यावर बोळा फिरवला आहे, कारण चीनला देखील त्या परिषदेचें आमंत्रण दिलें पाहिजे असा त्याचा चुकीचा आग्रह आहे. एक तर अमेरिका कम्युनिस्ट चीनला आमंत्रण द्यायला तयार होणार नाहीं. शिवाय सर्व जागतिक प्रश्नांची गल्लत करण्याचें कारण नाहीं. कांहीं आशियाई प्रश्न कोरियन राजकीय परिषदेंत चर्चिले जाणार आहेत. बाकीच्या प्रश्नांच्या निकालासाठीं वेगळी परिषद् भरविण्याची कल्पना अमेरिकेला मान्य आहे. शिवाय, पहिली राष्ट्रप्रमुखांची बैठक यशस्वी झाली तर तशा तऱ्हेच्या बैठका परत भरवतां येतील आणि त्या बैठकींचें आमंत्रण कम्युनिस्ट चीनला देखील जाईल असे प्रयत्न करतां येतील. म्हणून पहिल्याच बैठकी-च्या बाबतींत रशियानें चीनविषयीं आग्रह धरणें योग्य वाटत नाहीं. रशियानें तो आग्रह सोडला तर अद्याप देखील चार्चिल यांना अमेरिकेचें मन वळविण्याचा प्रयत्न करतां येईल. त्यांची व प्रेसिडेंट एसेनहॉवर व फ्रेंच पंतप्रधान मॉ. लॅनिये यांची बर्मुडा येथें डिसेंबरमध्यें परिषद् भरणार आहे. त्या परिषदेपुढें चर्चिल पुन्हां परत आपली सूचना ठेवतीलच. तोंवर आंतरराष्ट्रीय तढीला कारणीभूत झालेले प्रश्न शांततेच्या मार्गानें सोडविण्याची आपली तयारी आहे अशी इतरांची खात्री पटण्यासारखें रशियानें कांहीं केलें तर प्रे. ऐसेन-








हॉवर यांना चर्चिल यांची सूचना धुडकावून लावणें जड जाईल. तसें झालें तर राष्ट्रप्रमुखांची बैठक होऊं शकेल आणि मग त्या बैठकींतील चर्चेतून जर्मन प्रश्न सोडविण्याचा दोन्ही गटांना मान्य असा एखादा मार्ग निघूं शकेल.

आंतरराष्ट्रीय राजकारणांत युरोपचें जें महत्त्व तेंच युरोपिअन राजकारणांत जर्मनीचें आहे. युरोपमध्यें जर्मनी अशा मोक्याच्या जागीं बसलेला आहे कीं पूर्वेकडील राष्ट्रांना काय किंवा पश्चिमेकडील राष्ट्रांना काय त्याच्याकडे दुर्लक्ष करणें शक्य नाहीं. शिवाय नाना तऱ्हेचे जे उद्योगधंदे त्या देशांत वाढले आहेत त्यांच्यामुळें अर्थकारणांत त्याला एक अनन्यसामान्य महत्त्व प्राप्त झालें आहे. खेरीज उद्योगी व तंत्रकुशल आणि शूर व बाणेदार अशा लोकांचा तो देश आहे. हा देश ज्याच्या बाजूनें उभा राहील त्याची बाजू युरोपपुरती तरी वरचढ ठरल्यावांचून राहणार नाहीं. आपल्या बाजूला तो ओढण्याच्या राष्ट्रगटांच्या प्रयत्नामुळें आज त्या देशाचे दोन तुकडे पडले आहेत. हे तुकडे असेच कायम राहिले तर ते दोन्ही गटांना आणि जागतिक शांततेला भयावह ठरल्यावांचून राहणार नाहींत. म्हणून जर्मनीला आपल्या बाजूला ओढण्याचा दोन्ही गटांचा आग्रह बंद पडला पाहिजे. जर्मनी स्वतंत्रपणें शांत वृत्तीनें आणि तटस्थ पद्धतीनें युरोपमध्यें नांदूं शकतो. जर्मनीची ही भूमिका मान्य झाली तरच जर्मनीमध्यें लोकशाहीची वाढ होऊं शकेल आणि त्या देशाचें अजस्र औद्योगिक सामर्थ्य संहाराच्या कामाऐवजीं विकासाच्या कामीं उपयोगीं येईल. जर्मनीची ही भूमिका मान्य होणें दोन्ही राष्ट्रगटांच्या मान्यतेवर अवलंबून आहे. तसेंच स्वतंत्र जर्मनीमध्यें हुकुमशाहीची व लष्करी वृत्तीची वाढ होणार नाहीं यासाठीं जरूर ती तजवीज करणें हें देखील दोघांच्या संमतीनेंच होऊं शकतें. म्हणून जर्मनीचा प्रश्न सुटावयाचा तर तडजोडीच्या मार्गानेंच तो सोडविण्याचे प्रयत्न झाले पाहिजेत हें निश्चितपणें धरून चालावयास हवें. राष्ट्रगटांमध्यें ही तडजोडीची वृत्ति केव्हां निर्माण होईल कुणास ठाऊक? पण जोंवर ती निर्माण होत नाहीं तोंवर देशाचें ऐक्य आणि लोकशाहीची वाढ या दोन्ही गोष्टी जर्मन जनतेला लाभणार नाहींत.

---

## पत्रव्यवहार

### ‘उपासमार आणि लोकसंख्येची वाढ’

रा. रा. संपादक, नवभारत, यांस

सा. न. वि. वि.

आपल्या ‘नवभारता’च्या गेल्या नोव्हेंबर १९५३ च्या अंकांत ‘अन्नटंचाई व लोकसंख्येची वाढ’ हा डॉ. रा. अ. करंदीकर यांचा डॉ. कॅस्ट्रो यांच्या ‘Geography of Hunger’ या पुस्तकाच्या आधारें लिहिलेला लेख प्रसिद्ध झाला आहे. उपासमार व लोकसंख्येची वाढ यासंबंधी डॉ. कॅस्ट्रो यांनीं मांडलेला सिद्धांत त्यांच्या विवेचनाचा मुख्य गाभा आहे. त्या सिद्धांताच्या शास्त्रशुद्धतेवरूनच त्यांचें विवेचन शास्त्रशुद्ध व सिद्ध आहे कीं नाहीं तें ठरवावें लागेल. डॉ. कॅस्ट्रो यांचा हा सिद्धान्त त्यांनीं शास्त्रशुद्ध पुराव्यानें सिद्ध केला असें डॉ. करंदीकर यांचें मत दिसतें. तथापि वस्तुस्थिति तशी नाहीं. डॉ. कॅस्ट्रो यांनीं आपल्या सिद्धांताच्या पुष्ट्यर्थ दिलेले जीवशास्त्रांतील संशोधनाचे संदर्भ पुष्कळ ठिकाणीं चुकीचे आहेत असें आढळून येतें. डॉ. कॅस्ट्रो यांनीं दिलेला पुरावा व त्यावरून त्यांनीं काढलेलीं अनुमानें बरींच चुकीचीं आहेत यासंबंधींचें प्रत्यंतर लेखांत दिलेल्या कोष्टकावरूनसुद्धां सहज ध्यानांत येण्यासारखें आहे. डॉ. कॅस्ट्रो यांचें पुस्तक प्रसिद्ध झाल्यावर त्यावर आलेल्या तज्ज्ञांच्या अभिप्रायांतून हें सर्व स्पष्टपणें मांडण्यांत आलेलें आहे. डॉ. कॅस्ट्रो यांचा सिद्धान्त कसा असिद्ध आहे याचें स्पष्टीकरण सध्या सवडीच्या अभावीं मी करूं शकत नाहीं. कॅस्ट्रो यांचे सिद्धांत शास्त्रशुद्ध आहेत असा ‘नवभारता’च्या वाचकांचा गैरसमज होऊं नये म्हणून हें पत्र लिहिलें आहे.

१६-११-१९५३
पुणें

आपला
**नी. वि. सोवनी**








रवीन्द्रनाथ ठाकूर

# ‘ कालिदासाच्या काळीं – ! ’

कालिदासाच्या काळीं मी जर जन्मलों असतों तर नवरत्नमालेमध्यें आणखी एक दहावें रत्न झालों असतों. एक स्तुतिश्लोक गाऊन राजापासून एक सुंदर निकेतन मिळविलें असतें — उपवनवेष्टित, उज्जयिनीपासून अगदीं दूर, एकान्तस्थळीं ! तेथें रेवानदीच्या तटाकीं सोनचांफ्याच्या तळीं, काव्य-गोष्ठी करतां करतां, संध्याकाळ झाली असती. – आणि मग मी तेथील क्रीडाशैलावर विहार करीत काव्यसंगीताची एक लकेर स्वच्छंदानें सोडून दिली असती. माझी जीवननौका मंदाक्रांतेच्या तालावर डुलत डुलत वहात गेली असती !

मग त्यावेळीं कसली त्वरा ? कोठला मृत्यु नि कोठली जरा ? चिन्तेला तिलांजलि देऊन डौलानें मृदुमंद पदें टाकीत मी विहार करीत राहिलों असतों. षड् ऋतूंतील प्रत्येक ऋतूच्या सौन्दर्याची मौज पुनःपुनः लुटली असती – आणि षड् ऋतूंचें वर्णन सहा सर्गांत ग्रथित होऊन राहिलें असतें. मला दीर्घ विरहदुःखहि झालें असतें आणि मग मी तप्त अश्रुनदीप्रमाणें मन्दगति दीर्घ-करुण काव्यगाथा रचली असती. आषाढमासांतील मेघाप्रमाणें मंथरतेनें भरलेल्या माझ्या जीवनांत कोणतीहि त्वरा, घाई म्हणून राहिली नसती !

प्रियेच्या पदाघातानें अशोककुंज फुलून बहरला असता. प्रियेच्या मुखमदिरेनें बकुल मोहरून गेला असता ! माझ्या प्रियसखीचीं मंजुळ नांवें – रेवातटावरील कलहंसांच्या कलध्वनीप्रमाणें तिचीं तीं सर्व कलमधुर नांवें – मी स्वच्छंदानें गुणगुणत राहिलों असतों. कोणी मंदालिका, कोणी मंजलिका, कोणी चित्रलिखा, – अशा किती तरी सखी कुंजवनांत चैत्रांतील चांदण्या रात्रीं जमल्या असत्या. त्यांच्या मधुर नांवांच्या झंकाराचे निनाद जिकडे तिकडे भरून राहिले असते !

आणि काळ्याभोर केसांतून कुरबक पुष्पांचे गुच्छ खोंवले असते. हातांत आपलें सहज लीलाकमल घेतलें असतें ! कुन्दकुसुमांनीं केशपाश सजवून, कानांत शिरीषपुष्पें खोंवून, कटिमेखला म्हणून ताज्या कदंबपुष्पांची माळ ल्यालों असतों. धारायंत्राखालीं स्नान संपवून, धूपानें केशसंस्कार करून, लोध्रपुष्पांच्या रेणूंनीं मुख सुशोभित केलें असतें. कालागुरुचंदनाचा उत्कट परिमल माझ्या नेपथ्यप्रसाधनेला लपेटून आसमन्तात् दरवळला असता !

---

रवीन्द्रनाथ ठाकूर यांच्या ‘ सेकाल ’ या बंगाली कवितेचा मुक्तानुवाद — का. सं.

केशराच्या पत्रलेखेनें वक्षःस्थल भूषित करून, कडांवर हंसमिथुनें काढलेलें उत्तरीय मी परिधान केलें असतें. आषाढमासांत, विरहावस्थेंत, प्रियजनाच्या मीलनाच्या आशेनें, हातांतील पूजापुष्पांनीं विरहदिन मोजीत बसलों असतों. गाण्याकरितां वीणा उचलून छातीशीं घेतली असती, पण गान व आलाप विसरलों असतों. माझे रूक्ष केस माझ्या अश्रुपूर्ण नेत्रांवरून रुळत खालीं लोंबले असते ! मीलनाच्या रात्रीं चरणांतील नूपुरांचा झंकार निनादला असता !

माझ्या आवडत्या सारिकेला माझीं आवडतीं नांवें शिकविलीं असतीं. करुण झंकारमय तालावर मोराला नाचविलें असतें. कपोताला जवळ घेऊन त्याच्या मुखाचें चुंबन घेऊन त्याचे लाड केले असते. सारसीला कमळाच्या कळयांचा चारा खाऊं घातला असता. केस सांवरीत, वेणीला झटका देत शौरसेनी बोलींत प्रियसखीशीं गुजगोष्टी केल्या असत्या. प्रियसखीच्या गळयांत हात घालून म्हटलें असतें : ' हला प्रियसखि ! ' – बाल आम्रतरूच्या आळयाला पाणी घालीत प्रिय सारिकेला प्रिय नांवें शिकविलीं असतीं.

नवरत्नांच्या सभेंत एकटाच एका बाजूला ऐटीनें बसून राहिलों असतों. दिङ्नागाचार्याला दुरूनच नमस्कार केला असता. विश्वसेन, देवदत्त, किंवा वसुभूति अशासारखें एखादें सभ्य नांव बहुधा मला मिळालें असतें. स्रग्धरा किंवा मालिनीवृत्तांत बिंबाधरांच्या स्तुतिगीतांनीं दोनचार छोटयामोठया पोथ्या रचून टाकल्या असत्या. आणि श्लोकरचना संपल्यावर ताडकन् उठून त्वरेनें घरीं गेलों असतों.

कालिदासाच्या काळीं जर मी जन्मलों असतों तर कोणत्या मालविकेच्या जाळयांत सांपडून बंदिस्थ झालों असतों कोण जाणें ! एखाद्या वसन्तमहोत्सवांत, वेणुवीणांचे कलरव निनादत आहेत, कुंजवन बहरून मोहरून गेलें आहे, फाल्गुनांतील शुक्ल निशा प्रकाशत आहे – अशा समयीं ऐन यौवनाच्या नशेंत मग्न असतांना, राजाच्या चित्रशाळेंत कोणा सुंदरीचें अकस्मात् दर्शन घडून मी विस्मित झालों असतों ! – आणि मग त्या सुंदरीचा पदर कांहींतरी मिषानें सहकारवृक्षाच्या शाखेला अडकला असता !

हाय् ! अरेरे ! कालिदासाचा काळ निघून गेला आहे ! इकडे पंडितमंडळी तारीख, साल घेऊन कालिदासाच्या कालनिर्णयाचा वाद करीत बसली आहेत. कालिदासाच्या जीवनाचीं तीं वर्षेंच हरवलीं आहेत, लुप्त झालीं आहेत. इतिहासानें त्याबाबत मुग्धता धारण केली आहे. बाकी तेंहि बरेंच झालें म्हणा ! कटकट मिटली ! फुकटचा वितंडवाद ! पण अरेरे ! त्या कालिदासाबरोबर त्या काळच्या पौरनारी, निपुणिका–चतुरिका – मालविका यांचाहि मेळावा लुप्त व्हावा ना ! – वर-माला असलेलें तें सुंदर तबक आतां कोणत्या बरें स्वर्गांत नेलेलें असेल ?

त्या काळच्या त्या वरांगनांचें दर्शन-मीलन होणार नाहीं म्हणून मी त्या विरहदुःखानें अगदीं बेभान होऊन जातों.– पण लगेच मी भानावरहि येतों. मला दिसून येतें कीं आजहि बकुळीचीं फुलें, सुंदरींच्या मुखमदिरेचें सिंचन न मिळतांहि, कालिदासाच्या वेळेसारखींच बहरलेलीं फुललेलीं दिसून येतात. आजहि फाल्गुन








## कालिदासाच्या काळीं

महिन्यांत आळसानें अंग सुस्त होऊन अशोकवृक्षाच्या छायेंत बसलें असतां, दक्षिणे-कडून येणारा वारा कालिदासाच्या वेळेइतकाच गोड लागतो. कालिदासाच्या वेळच्या वरांगना आज जरी दिसत नसल्या, तरी आज अनेक परींनीं माझें सांत्वन होतच आहे.

वर्तमानकाळीं या मर्त्यलोकांत जें जें कांही आहे, त्याकडे कालिदासाच्या चक्षूंनीं पाहिलें असतां, ती प्रत्येक गोष्ट चांगली सुंदर दिसूं लागते. आजच्या सुंदरी बूटमोजे घालतात; घालूं देत! त्या नटतमुरडत चालतात; चालू देत! त्यांचे परकीय चालीचे वार्तालाप चालूं असतात; चालेनात का! पण कालिदासाच्या वेळीं जे कटाक्ष नेत्रांच्या अपांगांमधून उफाळून बाहेर पडत असत, तेच आजहि दृष्टीस पडून त्या वेळची साक्ष देत आहेत. -- आज निपुणिका-चतुरिका नाहींत म्हणून त्यांच्याबद्दलच्या शोकानें धाय खाऊन, बा कवे, मरून जाऊं नकोस. आजहि या मर्त्यलोकांत त्याच सुंदरी निराळ्या नांवांनीं विराजत आहेत.

आणि या विचारामुळें एकदम या क्षणीं आपाततः उसळणाऱ्या आनंदानें व अभिमानानें मी नाचतबागडत सुटलों आहे! कालिदासाचें आज नुसतें नांव आहे. पण मी तर आज प्रत्यक्ष जिवंत वावरतों आहे. मला आज उपलब्ध होणारे जे मृदुमंद स्वादगंध त्यांची मौज मी यथेच्छ लुटूं शकतों. पण त्या महाकवीला माझ्या आजच्या काळाचा एक कणहि मिळत नाहीं! लांब वेण्या उडवीत जाणाऱ्या अवखळ अशा आजच्या (आधुनिक) विनोदिनो — त्यांचें सौंदर्य त्या महाकवीच्या कल्पनेलाहि शिवलें नसेल! — प्रिये, तुझ्या तरुण डोळयांच्या अनुग्रहाची सारखी आराधना करीत असतां, प्रत्यक्ष कालिदासालाहि मी हार खायला लावली आहे. आणि त्या विजयाच्या अभिमानानें नाचत सुटलों आहे!








मुदलियार माध्यमिक-शिक्षण-समितीच्या शिफारशींचा परिचय-परामर्श : प्रा. पु. ना. वीरकर

# माध्यमिक शिक्षणांतील कांहीं महत्त्वाचे प्रश्न

मुदलियार माध्यमिक-शिक्षण-समितीच्या सुमारें २५० पृष्ठांच्या अहवालांत, पहिल्याच प्रकरणाच्या शेवटीं शेवटीं, आतांपर्यंत म्हणजे गेल्या साठसत्तर वर्षांत वेळोवेळीं नेमल्या गेलेल्या समित्यांच्या पुष्कळशा शिफारशी मुळींच अमलांत आणल्या गेल्या नाहींत याचा उल्लेख आलेला असून स्वतःच्या शिफारशींबाबत मात्र, त्यांपैकीं मान्य होणाऱ्या सर्व अंमलांत येण्यासंबंधीं आपणांस पुष्कळच आशा वाटत असल्याचें समितीनें म्हटलें आहे.

या समितीनें अखिल–भारतांतील प्रमुख ठिकाणीं दौरा काढला. सर्वजण सर्व ठिकाणीं गेले नाहींत, पुण्यासारख्या ठिकाणीं तर दोनतीनच लोक येऊन गेले. प्रत्येक ठिकाणच्या सर्वोत्कृष्ट व अनुभवी तज्ज्ञांच्या मुलाखती घेतल्या गेल्याच असें झालें नाहीं–अशा किरकोळ बाबी सोडल्या, तरी अनेक ठिकाणीं जाऊन, थोड्याफार मुलाखती घेऊन, व विशेषतः छापील प्रश्नमालिका शेंकडों ठिकाणीं गेल्यावर पुष्कळशीं उत्तरें आलीं तेव्हांच समितीनें आपला अहवाल तयार केला.

भारतांत प्रान्त अनेक, व कांहीं प्रश्न सर्वच प्रान्तांना सारखे असे असले, तरी प्रान्तांप्रान्तांच्या परिस्थितीमध्यें कांहीं महत्त्वाच्या बाबतींत फार फरक असल्यानें कांहीं शिफारशींत मुंबईसारख्या प्रान्तांच्या दृष्टीनें मुळींच सुधारणा सुचविलीसें वाटत नाहीं. उदा०,प्राथमिक चार इयत्ता झाल्यानंतर मिडल् स्कूलचीं तीन व हायस्कूलचीं चार वर्षें असावींत व त्यानंतर पदवीचा अभ्यासक्रम तीन वर्षांचा असावा, इंटरमीजिएट परीक्षा काढून टाकावी, असें समिति सुचविते. (–ही शिफारस अर्थात् राधाकृष्णन् कमिशननें आधीं केलेलीच आहे.–) त्यामुळें एकूण शिक्षणाचें एक वर्ष कमी होईल हें आर्थिक दृष्ट्या पालकांच्या हिताचें असलें तरी पदवीपर्यंत मिळूं शकणाऱ्या एकंदर शिक्षणामध्यें तेवढी घटच होईल. ज्या प्रांतांत हायस्कूलचें शिक्षण सहाच वर्षांचें आहे, तेथें मात्र कॉलेजचें एक वर्ष कमी करुन हायस्कूलचें एक वाढविल्यानें कॉलेजपेक्षां हायस्कूलमध्यें वैयक्तिक लक्ष पुरविण्याची शक्यता अधिक, म्हणून सध्यांपेक्षां थोडा फायदाच होईल असें समिति म्हणते. आपल्या प्रांतांत शालान्त परीक्षा उत्तीर्ण होणाऱ्या सर्वसाधारण विद्यार्थ्यास कॉलेजमध्यें दिलें जाणारें शिक्षण सहज झेंपण्याइतका त्यांचा दर्जा अलीकडे रहात नाहीं, अशी तक्रार आधींच होऊं लागली आहे. त्यांत एकूण अभ्यासक्रमाचें एक वर्ष कमी केल्यानें विद्यार्थ्यांच्या ज्ञानाची पातळी आणखीच खालावणें स्वाभाविक. मग तेवढ्या वर्षांत सध्यांचा दर्जा कायम ठेवून शिक्षण देणें असल्यास एकूण शिक्षणक्रमाची विशेषच काळजीपूर्वक पुनर्रचना करावी लागेल.

मिडल्-स्कूलनंतरचें शिक्षण देणाऱ्या म्हणजे हायस्कूलच्या स्वरूपाच्या शाळांमध्यें, विविध अभ्यासक्रम ठेवावेत, असें समिति प्रतिपादन करिते. कांहीं सर्वसामान्यपणें उपयोगीं पडणारे विषय सर्वांना आवश्यक व शिवाय अनेक ऐच्छिक विषयांतून विद्यार्थ्यानें आपली आवड, कुवत इत्यादिकांस अनुसरून कांहीं निवडून ते शिकावयाचे अशी त्या शाळेंत सोय असावी, असेंहि समितीचें म्हणणें आहे. एका शाळेला विविध ऐच्छिक विषय शिकवण्याची सोय करणें हें आर्थिक दृष्ट्या जवळजवळ अशक्य आहे. अशा शाळांना जास्त सरकारी मदत द्यावी लागेल असा एक अगदीं मोघम उल्लेख अहवालांतील पुढील एका प्रकरणांत करण्यापलीकडे समिति या बाबतींत अधिक खोलांत शिरलेली नाहीं.

### व्यावसायिक शिक्षण

विशेषतः ग्रामीण विभागांत शेतकीचें शिक्षण देणाऱ्या पुष्कळच शाळा निघाल्या पाहिजेत असें समिति आग्रहानें म्हणते. भारत हा कृषिप्रधान देश, सर्वांनाच एका प्रकारचें पुस्तकी शिक्षण नको, शिक्षण जीवनोपयोगी हवें इत्यादि अनेक कारणांमुळें ही शिफारस योग्य आहे असें वाटलें, तरी पण बोटांवर मोजण्याइतक्याच








ज्या शाळा गेलीं कांहीं वर्षें शेतकीचें शिक्षण देत आहेत, त्यांतून बाहेर पडलेल्या सर्व विद्यार्थ्यांचें पुढें काय झालें, याबद्दल माहिति मिळवून त्या माहितीची जोड या शिफारशीला दिली असती, तर तिचें महत्त्व फार वाढलें असतें. अर्थात् अशा शाळांतून बहुंशीं तात्त्विक ( Theoretical ) आणि व्यवहारांत अनुपयोगी असेंच शिक्षण दिलें जात असल्याची मात्र समिति तक्रार करिते.

व्यावसायिक शिक्षणाबाबतचें समितीचें विवेचन पुष्कळसें चांगलें आहे. परदेशांप्रमाणें आपल्याहि देशांत अनेक व्यवसायांचें शिक्षण देणाऱ्या संस्था ( Polytechnics ) स्थापन करण्याची अतिशय जरूरी आहे. ही मागणी अर्थात् पुष्कळ दिवसांपासून केली जात आहे, आणि ती जरूरी समितीनेंहि मान्य केली आहे. १८८२ सालच्या हंटर कमिशनच्या वेळच्या आणि आजच्या व्यावसायिक शिक्षणविषयक परिस्थितींत फारसा फरक पडलेला नाहीं असें समिति स्पष्ट सांगते, आणि याला आर्थिक व इतर अडचणींमुळें सरकारनें लक्ष्य पुरविलें नाहीं अशाच स्वरूपाचीं कारणें समिति देते. सर्वसामान्य पुस्तकी शिक्षणाशीं तुलना करतां धंदेशिक्षणाचें मुख्य उद्दिष्ट उदरनिर्वाह आहे, हें सांगण्याची जरूरी नाहीं. आणि धंदेशिक्षण घेणारांची संख्या पूर्वींहून अधिक झाली असूनहि बेकारीचा प्रश्न सुटला नाहीं असें असेल, तर उपरिनिर्दिष्ट उद्दिष्ट कितीसें सफल झालें म्हणावें ? अर्थात् या बेकारीला मुख्य कारण उद्योगधंद्यांची आपल्या देशांत म्हणण्यासारखी वाढ झालेली नाहीं हेंच होय. केवळ चांगल्या दर्जाचें व्यावसायिक शिक्षण घेतलेले लोक उद्योगांत शिरले कीं उद्योगधंद्यांची वाढ होईल आणि बेकारी दूर होण्यास मदत होईल असें जें कमिशननें म्हटलें आहे, तें तर्कशुद्ध वाटत नाहीं. भरपूर द्रव्याच्या व इतर सोयींच्या अभावीं उद्योगधंद्यांची वाढच झाली नाहीं, तर केवळ उत्तम शिकलेल्यांची संख्या वाढून काय होणार ? उलट त्यांच्या पदरीं मात्र निराशाच येण्याचा संभव !

धंदेशिक्षणांत प्रत्यक्ष शिक्षणा-(Practical Training)-लाच फार महत्त्व आहे. परदेशांत कारखान्यांतून शिकाऊ कारागीर ( Apprentices ) म्हणून काम करण्यास भरपूर संधि मिळते. तशी सोय आपल्याकडे जवळजवळ नसल्यामुळें पुष्कळांस खरें धंदेशिक्षण मिळणें हें अशक्य होऊन बसलें आहे. त्याकरितां "आहेत त्या कारखानेवाल्यांनीं व धंदेवाल्यांनीं विद्यार्थ्यांना Apprentices म्हणून घेतलेंच पाहिजे, अशी सक्ति करणारा कायदा झाला पाहिजे " ही समितीनें केलेली शिफारस उत्तम आहे. त्याबरोबर व्यापार व उद्योगधंदे या क्षेत्रांतून एक ' व्यवसाय-शिक्षण-कर ' गोळा करण्यांत यावा व त्याचा विनियोग धंदेशिक्षणाकडे केला जावा हीहि समितीची सूचना स्वागतार्ह आहे. पण या शिफारशी कागदावरच न रहातील तर सुदैव !

कांहीं महत्त्वाचीं तत्त्वें डोळ्यांसमोर ठेविलीं, व योग्य प्रकारें व व्यवस्थितपणें कारभार चालवला तर 'पब्लिक स्कूल्स'चा आपल्या देशांतहि कांहीं वर्षें—इतर शाळांतून नेतृत्वाचें शिक्षण देणें शक्य होईपर्यंत—उपयोग आहे, असें समितीचें मत आहे. मात्र या शाळांचा फायदा केवळ श्रीमंत मुलांनाच मिळणें इष्ट नाहीं. म्हणून सर्व दृष्टींनीं लायक पण गरीब अशा कांहीं विद्यार्थ्यांना तरी पब्लिक स्कूल्समध्यें पुरेशी शिष्यवृत्ति देऊन ठेवावें ही कल्पना स्वागतार्ह आहे. अर्थात् समितीनें निरनिराळ्या ठिकाणांहून मागविलेल्या मतांत ही सूचना केली गेली होतीच.

' रेसिडेन्शिअल डे स्कूल्स 'ची जी कल्पना अहवालांत सुचविली गेली आहे, ती कांहीं अंशीं विचारार्ह आहे. सकाळीं ८ ते सायंकाळीं ६ पर्यंत विद्यार्थी शाळेंतच राहील अशी सोय करणाऱ्या अनेक शाळा निघाव्यात असें त्या सूचनेचें स्वरूप आहे. अर्थात् साध्या डे ' स्कूल्स 'पेक्षां या शाळांतून शिक्षकांचा व मुलांचा संबंध अधिक निकटचा, अधिक वेळपावेतों येईल, त्यामुळें अभ्यास व इतर बाबींमध्यें मुलांचा पुष्कळच फायदा होईल हें निस्संशय. पण याला आवश्यक, मूलभूत बाब जी खर्चाची, तीबद्दल समिति कांहींच म्हणत नाहीं. साध्या शाळा चालविणेंच सध्यांच्या दिवसांत अशक्य होत चाललें आहे; त्यांत जवळजवळ दुप्पट वेळ शाळा चालवावयाच्या, तर शाळांचा खर्च कितीतरी वाढणार ! तो देणारे, तसेंच इतका वेळ आपली मुलें घराबाहेर राहूं देऊं शकणारे पालक थोडे. म्हणजे पुनः आर्थिक स्थिति चांगली असलेल्यांनाच ही सोय उपयोगीं पडणार. मात्र या शाळा, विशेषतः जेथें उद्योगधंदे अधिक प्रमाणांत चालू असतील म्हणजे जेथें कामगारांचीच वस्ती पुष्कळ असेल, अशा गांवीं उप-








योगी ठरतील असें जें समितीनें म्हटलें आहे तें खरें आहे. पण अशा ठिकाणीं कारखानेवाल्यांनींच या प्रकारच्या शाळा काढून त्यांच्या खर्चाची जबाबदारी उचलली, तर कामगारवर्गाचें केवढें तरी हित होईल. पण कारखानेवाल्यांस असें करावयास लावावयाचें कसें ?

स्त्रीशिक्षणाबाबत आणि सहशिक्षण देणाऱ्या शाळांबाबत समितीनें अगदींच मामुली, जवळजवळ सध्यांचें आहे तेंच सुचविलें आहे. 'जेथें स्वतन्त्र मुलींच्याच शाळांबद्दल मागणी असेल तेथें प्रांतिक सरकारनें त्या उघडाव्यात' ही एक सूचना आहे. पण हा पुनः सरकारनें खर्च करण्याचा प्रश्न आला !

### भाषा किती व कोणत्या ?

माध्यमिक शिक्षणाच्या सहा-सात वर्षांत विद्यार्थ्यांनें भाषा किती व कोणत्या शिकाव्यात, व शाळांतून एकंदर अभ्यासक्रम काय असावा, याचें समितीनें दोन प्रकरणांत सविस्तर विवेचन केलें आहे. भारतांत प्रांतभाषा निरनिराळ्या; म्हणून इतर देशांपेक्षां आपल्या देशांत अधिक भाषा शिकाव्या लागणें ही परिस्थिति कष्टदायक असली, तरी कांहीं अंशीं अपरिहार्य आहे. या भाषाविषयक प्रश्नाबद्दल लोकांनीं मांडलेलीं दोन्हीं बाजूंचीं मतें समितीनें सविस्तर दिलीं आहेत, व शेवटीं आपले निष्कर्ष काढले आहेत.

मिडल्स्कूल अवस्थेंत (–मातृभाषेचा प्रश्नच नाहीं, पण तिच्या शिवाय–) हिंदी तिन्हीं वर्षें आवश्यक ठेवावी, व इंग्रजी शिकणें सहावी व सातवी या दोन वर्षांत ऐच्छिक असावें, असें मत समितीनें व्यक्त केलें आहे. आपल्या प्रान्तांत पुढील वर्षापासून मिडल्स्कूलमधून इंग्रजीचें अजिबात उच्चाटन करण्याचा निर्णय घेतला गेला असला, तरी समितीची वरील शिफारस एकंदर विचार करतां ग्राह्य वाटते. पुढील कित्येक वर्षें तरी, उच्च शिक्षण, निरनिराळ्या देशांशीं संबंध वगैरे गरजा लक्ष्यांत घेतां, निदान ज्या मुलांना पाहिजे तेवढ्यांना तरी, इंग्रजाच सहा वर्षें शिक्षण घेण्याची मुभा असणें अगत्याचें आहे. त्या दृष्टीनें, जेथें शक्य होईल तेथें, ज्यांना इच्छा असेल तेवढ्यांना तरी इंग्रजीचें शिक्षण ६ व ७ या इयत्तांतून घेतां यावें ही सूचना योग्य आहे. त्यानंतर हायस्कूलमधल्या चार वर्षांत, पूर्वी ज्यांनीं इंग्रजी घेतलें नसेल त्यांच्यासाठीं प्राथमिक स्वरूपाचा, ज्यांनीं पूर्वी घेतलें असेल त्यांच्यासाठीं जास्त दर्ज्याचा ( advanced ) असे इंग्रजीचे दोन अभ्यासक्रम समितीनें सुचविले आहेत. ज्यांना उच्च शिक्षणाच्या अथवा भावी जीवनाच्या दृष्टीनें इंग्रजी पाहिजे असेल, त्यांना तें निदान जरूर तेवढें शिकतां यावें, व इतरांना तें व्यवहारापुरतें शिकलें म्हणजे झालें–अशी वस्तुतः इंग्रजीच्या शिक्षणाची माध्यमिक अवस्थेंत परिस्थिति असावयास पाहिजे, व ती वरील सूचनेनें बऱ्याच प्रमाणांत साध्य होईल असें वाटतें. अर्थात् इंग्रजीची सोयच नसल्यानें इंग्रजीशिवाय सातवी उत्तीर्ण झालेल्या ज्या विद्यार्थ्यांना हायस्कूलमध्यें इंग्रजीचा जास्ती प्रमाणांत ( advanced ) अभ्यासक्रमच घ्यावयाचा असेल त्यांसाठीं सातवीनंतर,पूर्वीच्या स्पेशल क्लासप्रमाणें कांहींतरी सोय करावी लागेल. ज्यांना इंग्रजी अजिबातच नको आहे, त्यांच्यासाठीं हायस्कूलमध्येंहि इंग्रजी सोडून दुसरी एखादी भाषा घेण्याची सवलत कमिशननें ठेवली आहे. मागें इंग्रजीच्या प्राध्यापकांची एक परिषद् भरली होती, तिनें माध्यमिक शाळांतून सहा वर्षें इंग्रजी सक्तीनें शिकवावें अशी शिफारस केली होती. त्या त्या विषयाचेच लोक घेतले, तर त्यांचा आपल्या विषयाकडे संपूर्ण कल झुकणार, हें स्पष्ट आहे. सर्व शिक्षणतज्ज्ञांना व इंग्रजीखेरीज इतर विषयांच्या शिक्षकांना इंग्रजीचें महत्त्व किती वाटतें हेंहि जमेस धरावयास हवें. आणि इंग्रजीचें महत्त्व जाणूनहि, ज्यांना इंग्रजी नको आहे, व ज्यांची त्या विषयांत गति नाहीं त्यांना, इंग्रजी नाही तर पुढील शिक्षणच नाहीं, अशी जबरदस्ती करण्यांत तात्पर्य नाहीं. सर्व दृष्टींनीं विचार करतां इंग्रजीबाबत कमिशननें केलेली सूचना जास्तींत जास्त लोकांच्या सोयीची वाटते.

हिन्दी इ. ५ ते ७ मध्यें शिकविली जावीच (–मात्र मातृभाषा हिन्दी असेल, तर विद्यार्थ्यानें आणखी एक तरी भाषा इ. ५ ते ७ मध्यें शिकावी असें समितीनें म्हटलें आहे–), पण इ. ८ ते ११ मध्यें विद्यार्थ्याला हिन्दी सोडावयाचीच असेल, व तीऐवजीं दुसरी एखादी भाषा घ्यावयाची असेल तर तें मात्र विद्यार्थ्यांच्या मर्जीवर ठेवावें, असें समितीचें मत आहे. इ. ८ ते ११ मध्यें स्वतःच्या भाषेसुद्धां कमींत कमी दोन भाषा विद्यार्थ्यानें शिकल्याच पाहिजेत; दुसरी भाषा त्यानें इंग्रजी, हिन्दी, संस्कृत इत्यादिकांतून








कोणतीहि निवडावी; मात्र दोहोंहून अधिक — चारपर्यंत — भाषाहि घेतां येतील, अशीहि सोय कमिशननें करून ठेवली आहे. ' क्लासिकल ' भाषा कमिशननें संपूर्णपणें ऐच्छिक केली आहे. स्वतःच्या भाषेहून इतर भाषांचें ज्ञान व्यवहारोपयोगितेच्या दृष्टीनेंच द्यावें असें समिति म्हणते. व्यवहार म्हणजे भाषा समजणें, तींत बोलतां येणें इत्यादि. हें सांगतांना 'क्लासिकल' भाषांचा अपवाद करण्यास समिति विसरलीसें दिसतें. किंवा 'क्लासिकल' भाषाहि ( व्यवहारास जरूर तेवढी ! ) बोलतां यावी अशी समितीची अपेक्षा असल्यास न कळे !

### हस्तव्यवसाय

इ. ५, ६ व ७ च्या अभ्यासक्रमांत कोणता ना कोणता तरी हस्तव्यवसाय असलाच पाहिजे असें समिति प्रतिपादन करिते, पण त्याला एकूण अभ्यासक्रमांत महत्त्व किती द्यावयाचें हें स्पष्ट नाहीं. हातानें काम करावयाची संवय लागून पोशाखीपणाची वृत्ति कमी होणें, कोणत्या विद्यार्थ्यांचा व्यवसायाकडे विशेष कल आहे हें शाळेंतच समजून येण्याची शक्यता निर्माण होणें इत्यादि अनेक फायद्यांमुळें कोणता ना कोणता तरी उपयुक्त हस्तव्यवसाय इ. ५ ते ७ च्या अभ्यासक्रमांत समाविष्ट करावा याबद्दल वाद नाहीं. इ. ८ ते ११ मध्यें देखील ऐच्छिक विषयांमध्यें हस्तव्यवसायाचा समावेश अवश्य असावा, व ज्या शाळांना तो शिकविण्याची सोय करणें शक्य आहे त्यांनीं ती करावी, हेंहि संमत होण्यासारखें आहे. पण इ. ८ ते ११ मध्यें सर्वत्र सक्तीनें हस्तव्यवसाय शिकविला जावा अशी जी समितीनें शिफारस केलेली आहे, ती मुळींच व्यवहार्य नाहीं. व्यवसाय-शिक्षणास लागणारी जागा, व इतर सोयींची तरतूद करणें व तो विषय शिकविण्यास लागणारा खर्च करणें ही गोष्ट खाजगी शाळांस शक्य आहे कीं नाहीं हें समितीनें पाहिलेलेंच दिसत नाहीं. मिडल् स्कूलच्या अवस्थेंतच हस्तव्यवसाय शिकविण्याची सोय करतां करतां शाळांची काय स्थिति झाली आहे, हें सांगावयास नको. आतां इ. ८ ते ११ यांमध्येंहि सर्व शाळांनीं हस्तव्यवसाय सक्तीनें शिकविण्याची व्यवस्था करावी या म्हणण्याचा व्यवहार्यतेच्या दृष्टीनें कांहीं एक उपयोग नाहीं.

समितीनें सुचविलेल्या, इ. ८ ते ११ मधील एकंदर अभ्यासक्रमांचा विचार करतां, प्रत्येकास आवश्यक असें किमान कांहीं ज्ञान मिळालें पाहिजे, एकंदर अभ्यासाचा बोजा डोईजड होईल अशी परिस्थिति नको, विद्यार्थ्याला आपल्या आवडीप्रमाणें, कलाप्रमाणें, कांहीं विषय निवडता येण्याची व कांही नको असतील ते सोडून देण्याची सोय असावी, इत्यादि अभ्यासक्रमविषयक महत्त्वाच्या गरजा भागण्यासारख्या आहेत, असें वाटतें. त्यांत फक्त वर सांगितल्याप्रमाणें हस्तव्यवसाय ऐच्छिक विषयांत समाविष्ट करणें तूर्त तरी आवश्यक आहे.

### पाठ्य पुस्तकें

पाठ्यपुस्तकांसंबन्धीं लिहितांना प्रचलित पाठ्य पुस्तकांचा दर्जा फार खालावला आहे, मंजूर करणाऱ्या समित्या नीट काम करीत नाहींत, पुस्तकें नेमतांना पुस्तकाच्या योग्यतेपेक्षां इतर गोष्टींचाच परिणाम नेमणारावर अनेक वेळां होतो, अशी निराशाजनक परिस्थिति समितीनें वर्णिली आहे. त्यांत सुधारणा घडवून आणण्यासाठीं, प्रत्येक प्रान्तांत एक उच्चाधिकारमंडळ नेमलें जावें अशी समितीची सूचना आहे. पण ज्या प्रकारच्या सदस्यांनीं या मंडळांत काम करावें असें समितीनें सुचविलें आहे, त्या लोकांना स्वतःचा व्याप संभाळून या बाबतींत त्यांच्याकडून अपेक्षिलेलें काम करावयास पुरेसा वेळ देतां येईल किंवा नाहीं हाच मुख्य प्रश्न आहे. या मंडळाच्या एकंदर कार्याला लागणारा खर्च सरकारनेंच केला, तर गोष्ट निराळी. पण शाळेला लागणारीं पुस्तकें तयार करवून घेऊन तीं प्रकाशित करणें हें एक काम या मंडळाकडे सोंपविलें आहे. त्या पुस्तकांच्या विक्रींतून होणारें उत्पन्न या मंडळाच्या या कामीं होणाऱ्या खर्चाकडे व आणखी कांहीं—उ० विद्यार्थ्यांना मधल्या वेळीं खावयास देणें वगैरेसारख्या गोष्टींकडे लावावें असें कमिशन सुचवितें. हें उत्पन्न इतक्या कार्यांस पुरेसें होईल किंवा नाहीं हा प्रश्न निराळा. पण पुस्तकांत विविधता, उत्कृष्ट लेखकांस पुढें येण्यास संधि, पुस्तकाच्या गुणांत वैशिष्ट्य, निवडावयास भरपूर बाव वगैरे फायद्यांच्या दृष्टीनें भाषेखेरीज इतर विषयांच्या बाबतींत मुदलियार समितीनें पुष्कळ पुस्तकें मंजूर करणें व त्यांतून पाहिजे तीं निवडण्याची मुभा असणें ही जी पद्धति चांगली म्हटली आहे, तोच न्याय भाषाविषयालाहि लागू करणें अवश्य आहे असें वाटतें.










असें उच्चाधिकारमंडळ नेमणें वगैरेपक्षां व्यवहार्यतेच्या दृष्टीनें पुढील एक सूचना निदान प्रयोगांत तरी आणून पहाण्यासारखी वाटते. पुस्तक मंजूर करण्यापूर्वी त्याच्या परीक्षणार्थ प्रत्येक विषयास जी परीक्षक-समिति असते, त्या समितीच्या सदस्यांची संख्या दोनतीन न ठेवतां पांचसातपर्यंत वाढवावी. ही संख्या वाढविल्यानें एकाददुसऱ्या सभासदावर पुस्तकाच्या गुणांखेरीज इतर गोष्टींचा पगडा बसला तरी इतर सभासदांची संख्या पुरेशी असल्यामुळे, अनिष्ट परिणाम टळतील. ते सर्व परीक्षक तो विषय आत्मसात् केलेले अनुभवी तज्ज्ञ असावेत व त्यांनीं हें काम कसोशीनें करावें, याकरितां त्यांना सध्यांप्रमाणें अत्यल्प मोबदला न देतां योग्य तें मानद्रव्य द्यावें.

शिकविण्याच्या पद्धतींमध्यें आमूलाग्र बदल झाला पाहिजे, वर्गांत 'ज्ञानामृता' चे घुटके देणें, विद्यार्थ्यांनें सतत घोकंपट्टी करणें—वगैरे सर्व जाऊन 'खऱ्या शिक्षणा'कडे, निरनिराळ्या शक्तींचा विकास करण्याकडे, अधिक लक्ष पुरविलें पाहिजे, पुस्तकी ज्ञानापेक्षां प्रत्यक्ष कृतींवर ( activities ) भर दिला पाहिजे—इत्यादींबाबत समितीनें केलेलें विवेचन व सूचना नवीन नाहींत. तसें व्हावयास पाहिजे हें शिक्षणक्षेत्रांत सर्वमान्य आहे. सध्यांची अनिष्ट परिस्थिति, मुख्यत्वेंकरून परीक्षेवरच एकूणएक भर द्यावा लागणें व परीक्षाहि नको त्या स्वरूपाचीच असणें, यांमुळें उत्पन्न झालेली आहे. खरें शिक्षण, शक्तींचा विकास, विद्यार्थ्यांच्या अंगचे निरनिराळे गुण व चांगल्या प्रवृत्ती इत्यादींना खरेखुरें महत्त्व आलें कीं, शाळांमध्येंहि शिक्षणपद्धति आपोआप बदलेल. सध्यां असलेला परीक्षेवरील फाजील भर व परीक्षा-पद्धति अनिष्ट असल्याचें समितीलाहि मान्य आहे. एकाच वार्षिक परीक्षेला महत्त्व न देतां सबंध वर्षांतील काम व परीक्षांचे निकाल लक्षांत घेणें, तसेंच शालान्तपरीक्षेचा निकाल लावतांना त्या परीक्षेंतील गुणांबरोबरच शाळेंतील एकंदर प्रगतीच्या नोंदीलाहि कांहीं प्रमाणांत किंमत देणें वगैरे सूचना योग्य आहेत. विशेषतः शाळा सोडतांना जें प्रमाणपत्र द्यावयाचें त्यांत सध्यांप्रमाणें केवळ शालान्त परीक्षेंतील गुणांचा निर्देश न करितां विद्यार्थ्याची शाळेंतील प्रगति, त्याच्या अंगचे गुण, त्यानें निरनिराळ्या क्षेत्रांत केलेली कामगिरी वगैरेंबाबत महत्त्वाच्या नोंदीहि केलेल्या असाव्यात, समितीची ही सूचना खरोखरच हितावह व शक्य तितक्या लौकर अमलांत आणण्यासारखी आहे.

शारीरिक शिक्षण, वैद्यकीय तपासणी, व्यवसायांसंबधीं माहिती व मार्गदर्शन, शीलसंवर्धन इत्यादि विषयांवरचीं प्रकरणें सामान्यच आहेत. नाहीं म्हणावयास शाळेंतील अभ्यासेतर कार्यक्रमांचें महत्त्व, आर्थिक अडचणींच्यापायीं त्यांचा विकास खुंटूं नये, त्यांसाठीं सरकारनें सढळहस्तानें मदत करावी; व्यवसाय-मार्गदर्शन अधिक उपयोगाचें व्हावें याकरितां व्यवसायासंबंधींचे चित्रपट तयार करवून घेऊन दाखवावेत, इत्यादि समितीच्या शिफारशी स्वागतार्ह वाटतात. परीक्षेला अवास्तव किंमत देऊं नये, त्याबरोबर शाळेंतील एकन्दर प्रगतीसंबन्धींच्या नोंदीहि जमेस धराव्यात, इत्यादि सूचनांबद्दल वर लिहिलेंच आहे. त्याशिवाय 'एसे टाईप' प्रश्नांच्या जोडीला वस्तुनिष्ठ चांचण्या ( objective tests ) असाव्यात, एकाच दिवशीं तीन तासांच्या दोन परीक्षा नसाव्यात, विद्यार्थी ज्या विषयांत उत्तीर्ण झाला नसेल, तेवढ्यांतच त्याला पुन्हां परीक्षा द्यावी लागावी वगैरे शिफारशी कोणासहि तेव्हांच मान्य होण्यासारख्या आहेत.

## शिक्षकांची आर्थिक परिस्थिति

शिक्षकांच्या आर्थिक परिस्थितींत सुधारणा झाली पाहिजे व त्यांना कांहीं बाबतींत सवलती दिल्या पाहिजेत, असें एका प्रकरणांत समिति म्हणते. शिक्षकांचे पगार योग्य व त्या त्या वेळच्या राहणीच्या मानाला अनुसरून असावेत, ते किती असावेत हें ठरविण्यासाठी वेळोवेळीं समित्या नेमल्या जाव्यात असें समितीनें अगदीं मोघमपणेंच म्हटलें आहे. मात्र त्यांना पेन्शन, विमा व प्रॉव्हिडंट फंड असा तिहेरी फायदा मिळवून देणारी ( एका प्रान्तांत सध्यां सरकारी नोकरांकरितां चालूं केलेलीच ) योजना सर्वत्र अमलांत आणावी, शिक्षकांना शिक्षणविषयक परिषदांसाठींच नव्हे, तर सुटींत चांगल्या हवेच्या ठिकाणीं जाण्याकरितांहि रेल्वेभाड्यांत निम्या दराची सवलत मिळावी, एकाच लायकीच्या शिक्षकांच्या वेतनश्रेणींत फरक असूं नयेत, घरें बांधणाऱ्या सहकारी संस्थांमार्फत शिक्षकांना शाळेजवळच घरें रहावयास मिळावींत, त्यांना हॉस्पिटल्समधून फुकट वैद्यकीय मदत मिळावी, देशांतील विविध शिक्षण-










संस्था पहावयासाठीं व परदेशांत जाऊन अभ्यास करण्यासाठीं त्यांना खास रजा दिली जावी वगैरे सूचनांना मूर्त स्वरूप देतां आल्यास शिक्षकवर्गाचें व त्यामुळें एकंदर शिक्षणकार्याचें निःसंशय हितच होईल. आणि असें होईल तर लायक लोक शिक्षकाच्या पेशांत शिरणें व समितीनें सुचविल्याप्रमाणें खाजगी शिकवण्यांची अनिष्ट पद्धत बंद करणें शक्य कोटींत येईल.

## शिक्षणखात्याचा कारभार

शिक्षणखात्याचे निरनिराळे घटक, त्याचा कारभार यांसंबंधीं समितीनें नवीन असें फारसें सांगितलेलें नाहीं. शिक्षणमंत्री व प्रांताचा शिक्षणाधिकारी ( Director of Education )यामध्यें सेक्रेटरी ही एक पायरी म्हणून असूं नये, शिक्षणाधिकारी थेट मंत्र्यालाच जबाबदार असावा, निरनिराळ्या खात्यांच्या मंत्र्यांनीं एकत्र येऊन शिक्षणावर जास्तींत जास्त पैसा खर्च करतां येण्याच्या दृष्टीनें कोणते उपाय योजावेत याचा वेळोवेळीं विचार करावा, एकसूत्रीकरणाचा विचार करणें, सरकारला सल्ला देणें वगैरे विविध कामांसाठीं प्रातिनिधिक स्वरूपाच्या पुष्कळशा समित्या नेमल्या जाव्यात वगैरे सूचना पटण्यासारख्याच आहेत. ' बोर्ड ऑफ सेकंडरी एज्युकेशन ' वर इतर प्रतिनिधींबरोबर जे चार मुख्याध्यापक असावेत ते नियुक्त (Nominated) असावेत असें समिति म्हणते तें पटत नाहीं. पुष्कळ वेळां लायकी, अनुभव वगैरेंपेक्षां इतर गोष्टींचाच परिणाम हे मुख्याध्यापक नियुक्त करितांना सरकारी अधिकाऱ्यांवर झालेला दिसून येतो. म्हणून विद्यापीठाच्या घटक संस्थांप्रमाणें याहि बाबतींत मुख्याध्यापकांची त्या त्या विभागापुरता एक एक मतदारसंघ ( Constituency ) करून त्यांतून चार प्रतिनिधि निवडणें हेंच योग्य होईल असें सुचवावेसें वाटतें.

सध्यांची शाळा तपासण्याची पद्धत, तपासणी करणारांची वृत्ति, त्यांची मार्गदर्शन करण्याची लायकी, याबद्दल एकंदरींत असमाधान व्यक्त करावें तेवढें थोडेंच. तपासणी करणारानें केवळ अधिकार गाजविणाराची भूमिका घेण्यापेक्षां ' सल्लागार ' व्हावें, तपासणी करणारे अधिकारी उत्तम शिकलेले व शाळेंत शिकविण्याचा पुष्कळ अनुभव घेतलेले असावेत, कांहीं अधिकारी तर लायक व अनुभवी शिक्षक व मुख्याध्यापक यांमधून कांहीं काळाकरितां तरी निवडावेत, वगैरे सूचना – शिक्षणक्षेत्रांतल्या व्यक्तींनीं आग्रहानें मांडलेल्या मतांना धरूनच – समितीनें केलेल्या आहेत.

प्रत्येक वर्गांत व प्रत्येक शाळेंत कमींत कमी व जास्तींत जास्त विद्यार्थी किती असावेत याबद्दल समितीनें कांहीं मर्यादा घालून दिल्या आहेत. कमींत कमीची मर्यादा ठरविण्यांत समितीचा काय हेतु आहे कळत नाहीं. शहरें सोडून इतर ठिकाणीं शाळा काढूंच नये अशी समितीची इच्छा आहे काय ? अशीं कित्येक गांवें आहेत कीं तेथें एकच शाळा व तींत ५०० पेक्षां कमीच विद्यार्थी आहेत. अशांनीं शिक्षण घेऊंच नये, कीं आपल्या गांवांतून उठून, लांब असलेल्या शहरांतच गेलें पाहिजे ? कारण एका शाळेंत विद्यार्थ्यांची संख्या ५०० हून कमी असतां कामा नये असें समिति म्हणते. तेंच ' प्रत्येक वर्गांत कमींत कमी ३० विद्यार्थी असलेच पाहिजेत ' या शिफारशीबाबत म्हणतां येईल. वर्गांतील व शाळेंतील जास्तींत जास्त संख्या अनुक्रमें ४० व ७५० असाव्यात, हें शाळेची एकंदर कार्यक्षमता वाढवण्याच्या दृष्टीनें ठीक आहे. पण ही मर्यादा घालतांना शाळांच्या आर्थिक परिस्थितीचा मुळींच विचार करण्याची समितीला जरूर दिसत नाहीं. वस्तुतः असल्या आंकड्याबाबत समितीनें कांहीं म्हटलें नसतें तरी एक वेळ चाललें असतें.

शेवटच्या, पण वास्तविक पहातां सर्वांत महत्त्वाच्या म्हणजे पैशाच्या प्रश्नाबद्दल अहवालांतील सुमारें सातच पानें खर्ची पडलीं आहेत. मात्र केंद्रसरकारनें माध्यमिक शिक्षणासाठीं प्रांतांस कांहीं मदत करावी ( – अर्थात् केन्द्रसरकारकडून मदत मिळण्याचा परिणाम प्रांतिक सरकारांनीं आपल्या खर्चांत तेवढी कपात करण्याकडे होऊं नये !–), व्यावसायिक शिक्षणासाठीं एक कर गोळा करण्यांत यावा, रेल्वे, पोस्ट इत्यादि खात्यांतील उत्पन्नापैकीं कांहीं भागाचा व्यवसायशिक्षणाकडे विनियोग करावा, अशा कांहीं सूचना पुष्कळच चांगल्या आहेत. तथापि प्रांतिक सरकारनें शाळांना मदत किती देणें जरूर आहे, याबद्दल आंकड्यांचा आधार देऊन समितीनें निश्चितपणें कांहींएक म्हटलेलें नाहीं.

## मोघम स्वरूपांत मांडलेल्या सदिच्छा

आतांपर्यंत, अहवालांतील एकंदर मजकुरापैकीं घेण्यासारखा वाटला तेवढा तपशील साधारणपणें क्रमानें घेऊन त्यापैकीं प्रत्येक मुद्द्यावर विवेचन केलें. आतां








समग्र अहवाल डोळ्यांपुढें ठेवून समितीच्या एकंदर कार्यासंबंधीं मत व्यक्त करणें व त्याचें मूल्यमापन करणें जरूरीचें आहे. एकंदरींत पाहतां कांहीं अगदीं थोड्या सूचना वगळल्यास हा अहवाल म्हणजे शिक्षणक्षेत्रांत काम करणाऱ्या व्यक्तींनीं प्रचलित माध्यमिक शिक्षण-विषयक परिस्थितीविषयीं सर्वसाधारणपणें मांडलेल्या मतांचें केवळ संकलनच वाटतें. सरकारनें योग्य ती मदत करावी, शिक्षकांना योग्य तें वेतन मिळावें, शिक्षकांनीं मनापासून काम करावें, शाळांतील वातावरण उत्तम असावें वगैरे अनेक सदिच्छाच अगदीं मोघम स्वरूपांत समितीनें अनेक ठिकाणीं व्यक्त केल्या आहेत. शिक्षकांना साधारणपणें किती वेतन मिळणें जरूर आहे, शाळांच्या आर्थिक अडचणी कशा स्वरूपाच्या व किती प्रमाणांत आहेत, त्यांचीं अंदाजपत्रकें काय सांगतात, त्यांना येणारी तूट भरून निघण्यासाठीं सरकारनें नक्की किती मदत करावयास पाहिजे, सध्यांचे फीचे दर योग्य आहेत किंवा नाहींत, सर्वसाधारण पालकांना ते परवडण्यासारखे आहेत किंवा कसें, नसल्यास ते कमी करून शाळाचा खर्च भागवण्यासाठीं काय करावें वगैरे कित्येक गोष्टींबाबत सर्वसामान्य उदाहरणें घेऊन कसोशीनें विचार करून समितीनें कांहीं मार्गदर्शन करावयास हवें होतें. कांहीं ठिकाणीं एखाद्या बी. टी. च्या विद्यार्थ्यानें परीक्षेंतील प्रश्नांचीं उत्तरें लिहावींत त्याप्रमाणें, नवीन कांहीं पटवून देणें किंवा आहे त्यावर विशेष प्रकाश पाडणें यासाठीं नव्हे, तर केवळ चांगल्या भाषेंत पण अकारण सविस्तर असें लेखन केलें गेलें आहे. अर्थात् ज्या कांहीं शिफारशी उपयुक्त व स्वागतार्ह आहेत त्या वरील विवेचनांत वेळोवेळीं निदर्शनास आणलेल्या आहेतच. अर्थात् शिक्षणव्यवसायांतील अनेक अनुभवी लोकांनीं पाठविलेल्या सूचनांपैकीं ज्या कित्येक निर्विवादपणें ग्राह्य व जवळजवळ आवश्यक स्वरूपाच्या सूचना समितीनें आपल्या अहवालांत उचलून धरल्या आहेत त्या अमलांत येण्यास जरूर तें आर्थिक साहाय्य करण्यास सरकारें जेव्हां समर्थ होतील व राष्ट्रीय शिक्षणाच्या खऱ्याखुऱ्या विकासाच्या दृष्टीनें लागणारें स्वातंत्र्य व उत्तेजन निदान लायक शिक्षक व शाळा यांना त्या सरकारांकडून मिळूं लागेल, तो सुदिन! स्वातंत्र्याच्या काळांत स्थापन झालेलें या प्रकारचें हें पहिलेंच कमिशन आहे, व त्याचा अहवाल संकलनात्मक असला, तरी तत्कालीन शिक्षणतज्ज्ञांना सर्वसाधारणपणें वाटणारे पुष्कळ विचार त्यांत प्रकट झाले आहेत. पूर्वींच्या समित्या परकीय सरकारनें नेमलेल्या होत्या, त्यांनीं निराळ्या हेतूनें आपल्या सूचना केल्या असतील, असें त्यांसंबंधीं कदाचित् म्हणतां आलें, तरी या समितीच्या शिफारशींबाबत तें कारण पुढें करण्याजोगें नाहीं. म्हणून यांतल्या उपयुक्त सूचना अंमलांत येऊन त्यांबाबत तरी 'आमच्या शिफारशींना मूर्त स्वरूप येण्याबद्दल आम्हांस पुष्कळ आशा वाटते' असें जें समितीनें प्रारंभींच म्हटलें आहे, तें सफळ होणें अवश्य वाटतें.

---

## आणि – तूं तरी कोण आहेस – ?

शास्त्रज्ञ म्हणाला: 'मी यान्त्रिक माणूस निर्माण करण्याच्या प्रयत्नांत आहे.'

संस्कृति खिन्नपणें हंसून म्हणाली: "अशा माणसांचे कारखाने निघून आज कितीतरी वर्षें झालीं.–आणि तूं तरी कोण आहेस?"

— देवदत्त दाभोलकर










## पुस्तक-परामर्श

**सुश्लोकमानस** ( गोस्वामी तुलसीदास यांच्या श्रीरामचरितमानसाचा मराठी सुरस श्लोकानुवाद ) भाग २ रा-रचयिता व प्रकाशकः डॉ. रा. चिं. श्रीखंडे ( १९५३ ). पानें २८+१९६. मूल्य ५ रुपये.

'सुश्लोकगोविन्द', 'सुश्लोककुमार', 'सुश्लोकमेघ' या सुरस सुश्लोकानुवादांचे कर्ते डॉ. रा. चिं. श्रीखंडे यांनीं गोस्वामी तुलसीदास यांचें सुप्रसिद्ध तुलसीरामायण किंवा 'रामचरितमानस' या महाकाव्याचा मराठी श्लोकानुवाद मराठी वाचकांना सादर करावयाचें योजिलें असून त्याप्रमाणें त्यांनीं 'सुश्लोकमानसा'चे दोन भाग आतांपर्यंत प्रसिद्ध केले आहेत. पहिला भाग गेल्या वर्षी प्रसिद्ध झाला असून त्यांत 'रामचरितमानसा'च्या समग्र बालकांडाचा श्लोकानुवाद आला आहे. त्यांत आलेले श्लोक सुमारें २१४० च्या वर आहेत. त्यानंतर प्रस्तुत **दुसरा भाग** या वर्षी प्रसिद्ध झाला असून त्यांत अनुक्रमें अयोध्याकांड, अरण्यकांड किष्किंधाकांड यांचा श्लोकबद्ध अनुवाद (एकंदर २३८२ श्लोकांचा ) आला आहे. यानंतर बाकी राहिलेलीं जीं तीन कांडें सुंदरकांड, लंकाकांड व उत्तरकांड यांचा सुमारें दोन हजार श्लोकांवर अनुवाद सादर करावयाचें आश्वासन अनुवादकांनीं प्रस्तावनेंत दिलें आहे.

संतशिरोमणि व श्रेष्ठकवि श्री गोस्वामी तुलसीदास (सन १५३३-१६२३) यांच्या 'रामचरितमानसा'नें हिंदी भाषी जनतेच्या हृदयाला किती चटका लावला आहे व हा काव्यग्रंथ अनेकांच्या नित्य पारायणाचा कसा होऊन बसला आहे हें सुविख्यातच आहे. अशा या सुरस 'तुलसीरामायणा'चा मराठी श्लोकबद्ध अनुवाद करून डॉ. रा. चिं. श्रीखंडे यांनीं हिंदींतील एका श्रेष्ठ संताच्या ग्रंथाची अवीट माधुरी मराठी वाचकाला उपलब्ध करून दिली आहे यांत शंका नाहीं. अर्थात् तुलसीदासांचें रामायण मराठींत आणण्याचा हा पहिलाच प्रयत्न नव्हे. यापूर्वी नागपूरचे श्री. या. शं. जामदार यांनीं केलेला तुलसीरामायणाचा मराठी सुरस गद्यानुवाद १९१३ मध्येंच प्रथम प्रसिद्ध झाला. त्यानंतर श्री. ग. स. भोपटकर ( ग्वाल्हेर ) यांचें 'मराठी चौपाई-वृत्त रामायण' (सन १९२०), स्वामी प्रज्ञानानन्दसरस्वती यांचें 'श्रीरामचरितमानस' ( १९५० ) हे दोन समवृत्त अनुवाद प्रसिद्ध झाले आहेत.

'सुश्लोकमानसा'चे लेखक डॉ. श्रीखंडे हे संस्कृत काव्यांत खोल अवगाहन केलेले रसिक पंडित असून त्यांच्या शैलीचा डौल जुन्या पंडित कवींच्या वळणाचा आहे. विविध वृत्तांतील श्लोकांतून निबद्ध झालेला त्यांचा प्रस्तुत अनुवाद वाचतांना वामन पंडित किंवा मोरोपंत यांसारख्या पंडित कवींच्या शैलींतून प्रतीत होणारें प्रागल्भ्य, प्रौढता आणि लालित्य या गुणांची आठवण होते. पंडित कवींचें काव्य संस्कृतप्रचुरतेमुळें पुष्कळ स्थळीं दुर्बोध होतें. अशा दुर्बोधतेपासून डॉ. श्रीखंडे यांचें प्रस्तुत 'सुश्लोकमानस' पुष्कळ अंशीं अलिप्त आहे असें म्हणतां येईल. मूळ संस्कृतांतून असलेली वाल्मीकिरामायणाची कथा तुलसीदासांनीं आपल्या प्रतिभेनें बहुजनसमाजाच्या भाषेत गुंफून गाइली. तेव्हां अशा काव्याचा अनुवाद शक्य तितका सुबोध बहुजनसुगम व्हावा, अशीच कोणीहि अपेक्षा करील आणि ती अपेक्षा प्रस्तुत श्लोकानुवादानें बऱ्याच अंशीं पूर्ण केली आहे. अनेक ठिकाणीं वर्णनाच्या ओघांत लेखकाची शैली मधुर व प्रसादयुक्त झाली असून, मूळ काव्याचें कल्पनावैभव प्रतीत होऊन आनंद होतो. वानगीदाखल पुढें कांहीं उदाहरणें दिलीं आहेत :

राम जेव्हां वनांत राहूं लागले त्या वेळेला

" तेथून वास करि राघव त्या वनांत  
तेथून सर्व वन मंगलदायि होत।  
पुष्पीं फलीं बहरले तरु वैभवानें  
वेष्टूनि वल्लरिगणीं बनलीं वितानें ॥  
त्यांची विभा बघुनि कल्पतरूसमान  
ते तेथ येत जणुं नंदनही त्यजून।  
गुंजारवा करिति मंजुल भृंगपंक्ती  
वायूहि मंद मधुगंधभरें वहाती ॥ "

अयोध्याकांड. पूर्वार्ध. २१।१४-१५

रामाला वनांत धाडून, आपल्यावर केवढा दुर्धर प्रसंग आपल्या आईनेंच ओढवून आणला याबद्दल भरताची मनःस्थिति त्याच्याच शब्दांत वर्णन केली आहे : 'अयोध्याकांड. उत्तरार्ध. ५।२५-२६'

" ऐसें हें मजसाठिं सर्व घडलें आहे भलें, त्यावरी  
देता राज्य मला तुम्ही मज गमे ही मात हो साजरी।  
कैकेयीजठरांतुनी निपजलों त्या हें नसें वाउगें  
धाता साधत हें समस्त जन हो! कां यत्न? राहा उगे!! ॥

आधीं ग्रहग्रासित त्यावरि वात झाला  
विंचू तयांत डसला असल्या जनाला।

त्यांतें पुन्हां पिचविली मदिरा विशेष
याहून काय उरला उपचार शेष ?॥ "

भरत पुढें नंदिग्रामांत येऊन ज्या वृत्तीनें राहिला तिचें वर्णन पहा : ( अयोध्याकांड, उत्तरार्ध २९-३२. )

" पुलक गात्रिं, हृदीं प्रभु जानकी
नयनिं नीर, सुनाम वसें मुखीं । "

राम वनांतून चालत जात असतांना पाहून ग्रामवासी लोक कळवळून म्हणतात : ( अयोध्याकांड पूर्वार्ध. १६, २-३ )

" ही स्पर्शिली मृदुमृदू चरणोत्पलांहि
संकोचते क्षिति, उरें जशिं आमुचीं हीं ।
जो यांसि देइ जगदीश वनाधिवास
तो मार्गिं कां न पसरी मृदु पुष्परास ? "

— वि. म. बेडेकर

*Journal of the Philosophical Association* edited by C. Bhattacharya and D. Y. Deshpande, ( Vidarbha Mahavidyalaya, Amravati, M. P. ) Vol. I. No. I, July 1953. Price Rs. 2/- Subscription Rs. 8/- yearly.

तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांत संशोधन करीत असलेल्या अभ्यासकांना एकत्र आणून त्यांचा परस्पर विचारविनिमय घडवून आणणें, तत्त्वज्ञानाविषयीं लोकांत आस्था उत्पन्न करून तर्कशुद्ध विचार करण्याच्या संवयीचें संवर्धन करणें हीं प्रधान उद्दिष्टें डोळ्यापुढें ठेवून, नागपूर-वऱ्हाड-खानदेशमधील कांहीं तत्त्वज्ञानाभ्यासू मित्रमंडळी एकत्र आली व त्यांनीं १९४९ सालीं आपलें 'तत्त्वज्ञानमंडळ' ( 'The Philosophical Association' ) सुरूं केलें. तेव्हांपासून दर वर्षी या मंडळाच्या सभा भरत आल्या असून, त्यांतून क्रियाशील (active) सभासदांनीं लिहिलेल्या निबंधांवर चर्चा करून विचारविनिमय चालूं ठेवला. आपला हा विचारविनिमय इतर आस्थेवाईक तत्त्वज्ञानाभ्यासकांपर्यंत पोहोंचावा या हेतूनें तत्त्वज्ञानमंडळानें नुकतेंच तत्त्वज्ञानाचें एक नियतकालिक सुरूं केलें आहे. त्याचाच प्रस्तुत अंक हा पहिला अंक होय. अंकांत एकंदर सात लेख आहेत त्यांपैकीं चार लेखांतून नैतिक स्वातंत्र्य, मानवी 'मूल्य'-कल्पना, 'चांगलें' किंवा 'श्रेय' हें वस्तुसापेक्ष कीं व्यक्तिसापेक्ष, इत्यादि जे प्रश्न आधुनिक विचारवंतापुढें सतत उभे असतात, त्या प्रश्नांसंबंधीं मूलगामी चर्चा केलेली आहे, हें या अंकाचें वैशिष्ट्य होय.— भारतासारख्या खंडप्राय देशांत केवळ तत्त्वज्ञानविषयाला वाहिलेलें असें The Philosophical Quarterly' हें एकमेव इंग्रजी त्रैमासिक आहे. त्याच्या जोडीला येऊन बसणारा एक अत्यंत स्तुत्य प्रयत्न म्हणून प्रस्तुत 'जर्नल'चें तत्त्वज्ञानाभ्यासक स्वागतच करतील.

— वि. म. बेडेकर

## कुष्ठरोगाचें निर्मूलन–

**प्रकाशक वा. वि दास्ताने , सन्मान्य कुष्ठरोगनिवारण प्रचाराधिकारी, मुंबई राज्य ( १९५२ ).** पानें ६५ किं. ८ आणे.

प्रस्तुत पुस्तिकेंत नाशिक येथील श्री. ग. वि. अकोलकर यांनीं श्री. टी. एन्. जगदीशन् यांच्या 'All about Leprosy' या विचारप्रवर्तक लेखसंग्रहाचें विषयवार संकलन करून त्याचा सुबोध अनुवाद सादर केला आहे. कुष्ठरोगाचें स्वरूप काय, त्याच्या संसर्गाची भीति वाटून त्याचा जो बाऊ केला जातो त्यांत कितपत तथ्य आहे, कुष्ठरोगनिवारणाचे उपाय कोणते, विशेषतः कुष्ठरोग्यांना समाजांतून बहिष्कृत मानण्याची प्रवृत्ति कशी अशास्त्रीय व माणुसकीला सोडून आहे याचें मुद्देसूद विवेचन प्रस्तुत पुस्तिकेंत आलें आहे. कुष्ठरोग्यांच्या शोचनीय स्थितीकडे भारतीयांचें लक्ष वेधून, त्यावर शास्त्रशुद्ध उपचार योजून त्यांची स्थिति सुधारण्याचें श्रेय महात्मा गांधींना आहे. अलीकडे गांधीस्मारकनिधींतून ५० लाख रुपये कुष्ठरोगनिवारणाकरितां वेगळे काढून ठेविले आहेत. पंचवार्षिक योजनेंतहि एक मध्यवर्ती कुष्ठरोगोपचार-संशोधन संस्था स्थापन करण्याची तरतूद केलेली आहे. सर्व हिंदुस्थानांत ३० कुष्ठरुग्णालयें असून कुष्ठरुग्णांच्या ११० वसाहती आहेत; फक्त १५००० कुष्ठरोग्यांचीच हॉस्पिटलमधून सोय होऊं शकते. सर्व जगांत सुमारें ५० लाख कुष्ठरोगी असून त्यांपैकीं मोठा हिस्सा म्हणजे सुमारें २० लाख कुष्ठरोगपीडित हिंदुस्थानांतले आहेत, हें लक्षांत घेतां, वरील तरतूद किती तुटपुंजी आहे हें ध्यानांत येईल. नॉर्वे या राष्ट्रानें कुष्ठरोगाचें निर्मूलन करीत कसें आणलें आहे याचा प्रस्तुत पुस्तिकेंत दिलेला वृत्तान्त उद्बोधक व स्फूर्तिप्रद आहे.

— वि. म. बेडेकर






